# नवभारत

नोव्हेंबर २०१३



अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्‌मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६७। अंक २। नोव्हेंबर २०१३
आश्विन/कार्तिक शके १९३५
वार्षिक वर्गणी ३०० रूपये
या अंकाची किंमत रू. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका






# नवभारत

## नोव्हेंबर २०१३

## अनुक्रमणिका

# श्रद्धांजली : प्रा. श्रीनिवास दीक्षित

अशोक चौसाळकर

महाराष्ट्रातील तत्त्वज्ञानाचे जेष्ठ अभ्यासक प्रा. दीक्षित यांचे वयाच्या ९२ व्या वर्षी नुकतेच निधन झाले. कोल्हापूरच्या ख्यातनाम राजाराम महाविद्यालयात त्यांनी तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून काम केले. त्या काळातील कोल्हापूरच्या अकॅडेमिक सर्कल्समध्ये त्यांचा चांगलाच दबदबा होता. त्यांचा वक्तशीरपणा, जीवनाकडे पाहण्याची त्यांची विशिष्ट दृष्टी, त्यांचे निर्वैरत्व व सर्वांत समानत्व पाहण्याची समत्वदृष्टी यांमुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व उठून दिसत असे. महाराष्ट्र तत्त्वज्ञान परिषदेची स्थापना झाल्यानंतर त्यात त्यांचा मोठा सहभाग असे आणि परिषदेची दोन अधिवेशने कोल्हापुरात घेण्यात त्यांचे योगदान मोठे होते.

प्रा. दीक्षितांचा पाश्चात्त्य व पौर्वात्य दोन्ही तत्त्वज्ञानांचा व्यासंग मोठा होता. या दोन्ही विचार-परंपरांतील अनेक साधनग्रंथ त्यांनी मुळातून वाचले होते. त्यांना संस्कृतमध्ये चांगली गती होती. त्यामुळे आपला 'भारतीय तत्त्वज्ञान' हा ग्रंथ लिहिताना मूळ ग्रंथांचा व त्यांतील विविध भाष्यांचा त्यांनी वापर केला होता. आज 'भारतीय तत्त्वज्ञान' हा त्यांचा ग्रंथ मराठी भाषेतील एक प्रमाणग्रंथ मानला जातो. अत्यंत सोपी भाषा, सुबोध विवेचन, निवेदनातील सरळपणा पण विवेचनाचा उत्तम दर्जा हे त्यांच्या या पुस्तकाचे वैशिष्ट्य होते. त्यांनी आग्रहाने मराठी भाषेत ग्रंथलेखन केले. त्यांच्या मते ह्या बाबतीत अडचण मराठी भाषेची नसून मराठीत लिहिणाऱ्या लेखकांची आहे. मराठी भाषेत तत्त्वज्ञानविषयक लिखाण करणे अवघड नाही.

नीतिशास्त्राचा थोडक्यात परिचय करून देणारा त्यांचा 'नीतिमीमांसा' हा ग्रंथ मोलाचा आहे; कारण त्यात केवळ नैतिक संकल्पनांचा ऊहापोह नाही, तर त्यांचे साक्षेपी विवेचन आहे. प्रा. दीक्षितांच्या मते साक्षेपी विवेचन म्हणजे त्या संकल्पनेवर घेतलेले आक्षेप लक्षात घेऊन केलेले विवेचन. संकल्पनांचे योग्य अर्थ समजावून सांगण्याची त्यांची वेगळीच हातोटी होती. 'पुरुषार्थ' या शब्दाची व्याख्या न्यायशास्त्राच्या मदतीने करताना ते लिहितात, की 'ज्या गोष्टीचे केवळ ज्ञान झाल्यावर ती गोष्ट आपल्याकडे असावी असे वाटते, इतक्या इच्छेच्या जी अधीन नाही, अशा इच्छेचा विषय म्हणजे पुरुषार्थ. तो कसा साध्य होईल, याच्या उपायांचे ज्ञान हे इतर इच्छांचे कारण होय.' या पुस्तकाचे वैशिष्ट्य सांगताना या पुस्तकाची प्रस्तावना लिहिणारे तत्त्वज्ञ प्रा. शि. स अंतरकर लिहितात, 'अनेक पाश्चात्त्य व भारतीय विचारवंतांची माहिती देणारे हे केवळ संकल्पनात्मक पुस्तक नसून त्या मतांची चिकित्सा करणारे, स्वतःची मते स्पष्ट व परखडपणे मांडणारे, म्हणून विचाराला चालना देणारे असे हे पुस्तक आहे. अशा विचारात मतभेदांना खूप वाव असतो. हे मतभेद अज्ञानजन्य वा आभिनिवेशजन्य नसून मानवी प्रकृतीच्या व जीवनाच्या जटिल व व्यामिश्र स्वरूपाच्या भानातून निर्माण होतात व ते विचारसमृद्धीचे लक्षण आहे.' असे मतभेद सततच होत राहिले. कोल्हापुरात एका सभेत सत्यशोधक कम्युनिस्ट पक्षाचे नेते कॉ. शरद पाटील यांच्या व्याख्यानाचे ते अध्यक्ष होते व आपल्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी पाटील यांची सर्व मते खोडून काढली. त्यामुळे संयोजकांची पंचाईत झाली!

प्रा. दीक्षित यांची धर्म, नीती व इहवाद या विषयांवर स्वतःची अशी मते होती. पुणे विद्यापीठाच्या गुरुदेव वा. द. रानडे व्याख्यानमालेत त्यांनी 'इहवाद, धर्म आणि नीती' या विषयावर ४ व ५ नोव्हेंबर १९७६ रोजी दोन व्याख्याने दिली आणि या व्याख्यानांत त्यांनी इहवादामुळे माणसांपुढे कोणते नैतिक प्रश्न निर्माण होतात, याचे विवेचन केले होते. पुस्तिकेला लिहिलेल्या आपल्या विवेचक प्रस्तावनेत विद्यापीठाचे त्या वेळचे कुलगुरू प्रा. देवदत्त दाभोलकर यांनी प्रा. दीक्षितांच्या विवेचनाबद्दल मतभेद व्यक्त केले व धर्म व नीती यांचा संबंध तोडून










इहवाद व नीती यांच्यात परस्परसंबंध स्थापन करणे आवश्यक आहे, असे मत मांडले. बर्ट्रंड रसेलच्या मताचा उल्लेख करून त्यांनी धर्मनिरपेक्ष नैतिक जीवन शक्य आहे व आवश्यक आहे, असे मत प्रतिपादन केले.

तात्त्विक चर्चेत व सौम्य खंडन-मंडनात त्यांना रस होता व त्यासंबंधी आपली मते ते निर्वैरबुद्धीने व कुणाचाही अधिक्षेप न करता मांडत असत. प्रा. आ. ह. साळुंखे यांच्या चार्वाकावरील ग्रंथाचे दीर्घ परीक्षण हे त्याचे उदाहरण होते. साळुंख्यांची सुबोध विवेचनशैली, पुस्तकात त्यांनी केलेली प्रमाण चिकित्सा व त्यांनी त्यासाठी घेतलेली मेहनत याचे त्यांना कौतुक होते; पण ते स्वत: आदर्शवादी तत्त्वविचारांचा पुरस्कार करीत असल्यामुळे त्यांच्या मांडणीवर टीका केली. त्यांनी केलेल्या विविध ग्रंथपरीक्षणांत, त्यांच्या लिखाणाची ही वैशिष्ट्ये दिसून येतात.

एप्रिल १९८० च्या 'नवभारत' मासिकात त्यांनी 'हिंदुत्ववाद' हा लेख लिहून एक प्रकारे नव्या वैचारिक वादळास जन्म दिला आणि नंतर त्याचेच सुधारित स्वरूप त्यांनी 'नवहिंदुत्ववाद' या लेखात मांडले. या लेखातील दीक्षितांची मांडणी आक्रमक हिंदुत्वविचारांची नव्हती आणि त्यांच्या विचारांत म. गांधी व विनोबा भावे यांच्या विचारांचे अधिष्ठान होते. सध्याच्या प्रदेशनिविष्ट राष्ट्रवादाऐवजी संस्कृतिनिविष्ट राष्ट्रवादाची, एक प्रकारच्या Civilisational state च्या कल्पनेची, त्यात त्यांनी मांडणी केली होती. राज्यसंस्था व राजकारण यांस वगळून पुढे जाता येईल का, हे पाहण्याचा त्यांचा प्रयत्न होता. राज्यसंस्था व राजकारण यांपासून आपणास दूर जाता येत नाही; कारण राष्ट्रवाद ही कल्पनाच राजकीय आहे व तिचे अधिष्ठानच प्रादेशिक आहे, असे मत त्यांच्यावर टीका करणाऱ्या अभ्यासकांनी मांडले; पण या विषयावर अभ्यासपूर्ण व सूत्रबद्ध असे विवेचन करून प्रा. दीक्षित यांनी या विषयास योगदान केले, असे म्हणता येईल. मात्र या सर्व वादविवादात मनाचे स्थैर्य त्यांनी कायम ठेवले.

प्रा. दीक्षित यांनी जीवनभर श्रेष्ठ असा नीतिविवेक जपला. त्यांच्या मते नैतिकता ही मूल्यांची गंगोत्री आहे. कृतकृत्य जीवन व कृतार्थ जीवन हे एकरूप आहेत, असेही मत त्यांनी व्यक्त केले. त्यांची ज्ञानसाधना आजीवन चालू राहिली आणि प्रा. मे. पुं. रेगे, प्रा. दि. य. देशपांडे, प्रा. शि. स. अंतरकर यांच्या मदतीने मराठी तत्त्वज्ञान परिषदेस गती देण्याच्या कामात त्यांनी मोठे योगदान केले. तत्त्वज्ञान या विषयातील इंग्रजी शब्दांस मराठी पारिभाषिक शब्द तयार करणे, मराठी भाषेत या विषयावरची प्रमाणभूत अशी पाठ्यपुस्तके तयार करणे व परिषदेची अधिवेशने दरवर्षी भरवणे या बाबींत त्यांना रस होता व त्याबाबत लागेल ती मदत करावयास ते तयार असत. 'नवभारत' व 'परामर्श'सारख्या नियतकालिकांत त्यांनी लिखाण पण केले.

प्रा. दीक्षित हे मागच्या पिढीतील विद्याभ्यास करून निरपेक्ष बुद्धीने ज्ञानदान करणाऱ्या प्राध्यापकाचे उत्तम असे प्रतिनिधी होते. सामाजिक प्रश्नांचा विचार करतानाही त्यांच्या नीतिविवेक जागृत होता. आज शरीराने ते जरी आपणातून गेलेले असले, तरी त्यांच्या ग्रंथरूपाने ते आपल्यात उपस्थित आहेत. त्यांच्या ज्ञानसाधनेची व नैतिक जीवन जगण्याच्या पद्धतीची थोडीजरी दीक्षा नव्या पिढीस घेता आली, तरी ती मोठी गोष्ट होईल.

***










# माल्कम एक्स, नेशन ऑफ इस्लाम, ब्लॅक पँथर व दलित पँथर

अशोक कृष्णाजी जोशी

माल्कम एक्स हा अमेरिकेतल्या ब्लॅक किंवा कृष्णवर्णीय लोकांचा मोठा व जहाल पुढारी म्हणून १९६० च्या दशकात गाजला. अमेरिकेच्या राजकीय व सामाजिक जीवनाला जे वेगळ्या व योग्य दिशेने कायमचे वळण १९६० च्या दशकात मिळाले, त्यात माल्कम एक्सचा महत्त्वपूर्ण वाटा आहे. कृष्णवर्णीयांना मानवी हक्क याच दशकात मिळाले, माणूस म्हणून सर्वसामान्य गौरवर्णीय अमेरिकन कृष्णवर्णीयांकडे याच दशकात या नव्या दृष्टीने पाहू लागले. वर्णभेदाच्या अंताची सुरुवात १९६० च्या दशकात खऱ्या अर्थाने झाली. त्याआधी शंभर वर्षांपासून जे प्रयत्न होत होते, त्यांना वर्णभेद-अंताची प्राथमिक तयारी असेच म्हणावे लागेल. (ती अतिशय महत्त्वाची होती.)

१९६० च्या दशकात अमेरिकेत कृष्णवर्णीयांच्या ज्या चळवळी होत्या, त्यांचे तीन गटांत वर्गीकरण करणे शक्य आहे – १) मार्टिन ल्यूथर किंगसारख्यांच्या लोकशाही व शांततापूर्ण मार्गाने जाणाऱ्या चळवळी, २) हिंसक मार्गाने जाणाऱ्या ब्लॅक पँथर मुखपत्र असणाऱ्या संघटने-सारख्या संघटनांच्या चळवळी व ३) नेशन ऑफ इस्लाम-सारखी चळवळ, जीमध्ये काळ्या व गोऱ्यांचे पटणे अशक्य आहे व गोऱ्यांच्या धर्मापेक्षा वेगळा असलेला इस्लाम धर्मच कृष्णवर्णीयांचा नैसर्गिक धर्म बनू शकतो, असे मानणारे व त्यासाठी प्रयत्न करणारे एलायझा महम्मदसारखे लोक होते. माल्कम एक्स याच तिसऱ्या गटात मोडतो. आयुष्यातला बराच काळ तो एलायझा महम्मदचा शिष्य व पाठीराखा राहिला, हे लक्षात ठेवावेच लागते.

हिंसक मृत्यूपूर्वी २-३ वर्षे माल्कम एक्सला वाटले, की आपली जीवनकथा शब्दबद्ध केली पाहिजे. त्याच वेळी आर्थर हेली हा कृष्णवर्णीय व त्या वेळी उमेदवारी करणारा लेखक त्याच्या संपर्कात आला. चळवळी करत असल्याने माल्कम एक्सला आपली जीवनकथा लिहिणे शक्य नव्हते. त्याने सवडीप्रमाणे अनेक मुलाखती २ वर्षे आर्थर हेलीला दिल्या. त्याने त्या शब्दबद्ध केल्या व त्याची ही जीवनकहाणी त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या व आर्थर हेलीच्या नावाने प्रसिद्ध झाली. या पुस्तकाच्या ३० लाखांपेक्षा जास्त प्रती संपल्या. त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. अनेक भाषांत त्याची भाषांतरे झाली. बेस्ट सेलर म्हणून ते पुस्तक गाजले. विसाव्या शतकातले महत्त्वाचे पुस्तक म्हणून ते नावाजले गेले. जगभरच्या वंचितांना ते आपलेसे व वाचनीय वाटले. अनेकांनी त्यापासून स्फूर्ती घेतली.

The Autobiography of Malcom X या पुस्तकाची १९९९ सालची आवृत्ती न्यू यॉर्कच्या Ballantine Books प्रकाशन संस्थेने केली. (हीच आवृत्ती इथे वापरली आहे.) या आवृत्तीचा foreword माल्कम एक्सचा मुलगा अटाला शाबाझने लिहिला आहे. (माल्कम एक्स म्हणून माल्कम एक्स प्रसिद्ध असला, तरी त्याने शाबाझ असे मुस्लिम नाव घेतले होते.) माल्कम एक्सचे चरित्रलेखक आर्थर हेली यांना अटाला आपला गॉडफादर मानतो. (गॉडफादर ही ख्रिश्चन कल्पना असून त्या शब्दाचा वापर चांगल्या अर्थानेही केला जातो, हे लक्षात घेणे आवश्यक आहे.) अटाला म्हणतो, की अमेरिकन शासन व बरेच गोरे लोक माल्कम एक्स जेव्हा जिवंत होते, तेव्हा त्यांना अतिरेकी व आपले शत्रू म्हणून मानत असत. पण अटालाने स्पष्ट केले आहे, की माल्कम एक क्रांतिकारक होते, ते हिंसेचे पुरस्कर्ते नव्हते. त्यांच्या भाषणांतून, शब्दांतून त्यांचा राग, चीड व्यक्त होई; पण ते दयाळू, हळुवार मनाचे व इतरांची काळजी घेणारे होते, असे तो सांगतो. आफ्रिकन-अमेरिकन कृष्णवर्णीयांना अमेरिकेत देण्यात येणाऱ्या वागणुकीने ते चिडत, रागावत, भावनावश होत. कृष्णवर्णीयांना न्यायाची व प्रेमाची वागणूक मिळावी, असे माल्कमना वाटे. त्याच्या वडिलांची – माल्कम एक्सची – सार्वजनिक प्रतिमा गूढ, समजायला

अनुक्रमणिका








अवघड अशा माणसाची होती; पण प्रत्यक्ष जीवनात ते तसे नव्हते, असे अटाला सांगतो. माल्कम एक्सच्या मृत्यूनंतर त्यांची सार्वजनिक प्रतिमा बदलली. अमेरिकन सरकारने त्यांच्या स्मरणार्थ टपालतिकीट काढले. २० जानेवारी १९९९ ला ह्या टपालतिकिटाचे विमोचन हार्लेमच्या अपोलो थिएटरमध्ये झाले. त्या वेळी त्याच्या जीवनावर काढलेली डॉक्युमेंटरी दाखवण्यात आली. अमेरिकन कृष्णवर्णीयांना स्वाभिमान शिकवणारा, त्यांच्यासमोर भविष्याची स्वप्ने उभी करणारा, कधीही आपल्या भूमिकेत बदल न करणारा, विकला न जाणारा कृष्णवर्णीय पुढारी म्हणून त्याची सार्वजनिक प्रतिमा निर्माण झाली.

या आत्मचरित्र-प्रकाशनानंतर अमेरिकन कृष्णवर्णीयांच्या प्रश्नाकडे समाजातल्या सर्वच थरांतल्या लोकांचे लक्ष वेधले गेले. मानवी हक्कांच्या दृष्टीने त्या प्रश्नाकडे पाहिले जाऊ लागले. न्याय, समता, बंधुता या मानवी मूल्यांचा विचार या संदर्भात केला जाऊ लागला. आपला जीवनहेतू काय, या प्रश्नाचा काही कृष्णवर्णीय विचार करू लागले. माल्कम एक्सने कृष्णवर्णीयांची व्यथा अतिशय जोरकसपणे शब्दांतून व्यक्त केली होती. त्यांनी जो राग आपल्या भाषणांतून व लिखाणांतून व्यक्त केला होता व आपला लढा न्याय, समता, प्रेम यांचा लढा आहे, हे स्पष्टपणे मांडले होते, त्याचाही काही परिणाम म्हणून हे घडले होते.

प्रत्यक्ष आयुष्यात माल्कम एक्स सर्वसाधारण कौटुंबिक जीवन जगणारा, कुटुंबावर मनापासून प्रेम करणारा, शुद्ध चारित्र्याचा माणूस होता, याची साक्ष त्याच्या जवळच्या अनेकांनी दिली आहे. विद्यापीठातले गौरवर्णीय विद्यार्थी न्याय, समता, प्रेम, बंधुभाव ही मानवी मूल्ये मानणारे असतात, हे अनुभवल्यावर तो सर्वसामान्य गोऱ्या लोकांसंबधी जी कडवट वक्तव्ये करीत असे, त्यात बदल होऊ लागला. आपल्या भूमिकेचे पुन:परीक्षण त्याला करावेसे वाटत होते, याचा पुरावाही आपल्याला मिळतो. भोवतालची परिस्थिती आता बदलत होती. कृष्णवर्णीयांना आता चांगली वागणूक मिळू लागली होती. मार्टिन ल्यूथर किंग, एलायझा मोहम्मद, माल्कम एक्स यांचे कित्येक दशकांचे प्रयत्न फळास येत होते.

एम. एस. हँडलर (M. S. Handler) ह्या न्यू यॉर्क टाइम्सच्या वार्ताहर होत्या. त्यांनी माल्कम एक्सची मार्च १९६३ ला एका रेस्टॉरंटमध्ये ३ तास जी मुलाखत घेतली, तिचा महत्त्वाचा भाग या पुस्तकात दिला आहे. या मुलाखतीदरम्यान माल्कम हॉटेलच्या दाराकडे लक्ष ठेवून होता, तो अतिशय सावध होता. कुठूनही मारेकरी हल्ला करू शकतात, हे त्याला माहीत होते. त्याचा पूर्वकाळचा गुरू एलायझा मोहम्मदशी त्याचे पटेनासे झाले होते. त्याच्या अनुयायांकडून हल्ला होईल अशी भीती माल्कमला वाटत होती, असे हँडलरला वाटले.

माल्कम एक्सचा नीग्रो ख्रिश्चन धर्मगुरूंवर विश्वास नव्हता. ते ख्रिश्चन धर्मगुरू गोऱ्या लोकांचे हस्तक आहेत व कृष्णवर्णीयांच्या उत्थानाआड ते येतात, असे माल्कम एक्सचे मत झाले होते. शांतता पाळून सनदशीर मार्गाने जाणारे मार्टिन ल्यूथर किंगसारखे लोकही कृष्णवर्णीयांचे हितरक्षक होऊ शकणार नाहीत, असे त्याचे स्पष्ट मत झाले होते. गोरे वंशवादी लोक तर स्पष्टपणे कृष्णवर्णीयांच्या हिताविरोधीच आहेत, असे त्याचे पक्के मत झाले होते. गोऱ्या लोकांप्रमाणेच कृष्णवर्णीयांतील मध्यमवर्गातल्या लोकांना माल्कम एक्स आवडत नसे; पण सामान्य कृष्णवर्णीयाला तो आवडत असे. त्याचा आक्रमकपणा, सरळपणा, सर्वसामान्य कृष्णवर्णीयाला आपलासा करे. स्वत:ची गुन्हेगारी पार्श्वभूमी त्याने कधीच लपवून ठेवली नाही. त्याचे चारित्र्य शुद्ध होते. त्याचा धार्मिकपणा सामान्य कृष्णवर्णीयांना आकर्षित करी. त्याला तडजोडवाद मान्यच नव्हता.

कृष्णवर्णीयांची समूह-अस्मिता त्याने जागी केली. आपण वेगळ्या आफ्रिकन संस्कृतीचे आहोत, तिच्याकडे वळणे आवश्यक आहे, असे त्याला वाटत होते. कृष्णवर्णीयांना आत्मजाणीव होणे व त्यांच्यात आत्मसन्मानाची भावना जागृत होणे यासाठी तो आयुष्यभर अथक रीतीने झटला.

माल्कम एक्सचे आत्मचरित्र अभ्यासणे आपल्यासाठी उद्‌बोधक होऊ शकते. एक क्रांतिकारक कसा बनतो, हे त्यातून कळते. एक सामान्य जीवन जगणारा माणूस – माल्कम एक्स तर लहानपणी गुन्हेगाराचे आयुष्य जगला – वाचनाने कसा बदलतो; एक वेगळेच

अनुक्रमणिका

आयुष्य तो कसे घडवतो; राजकीय जाणीव त्याच्यात जशी निर्माण होते, तशी नैतिक व धार्मिक जाणीवही त्याच्यात निर्माण कशी होते; अगदी निःस्वार्थीपणे कृष्णवर्णीयांसाठी काम केले, तर बरेच काम केले जाऊ शकते; सर्वांत मोठा त्याग केल्यास अगदी सामान्य माणूसही इतिहासात कसे स्थान मिळवतो, हे त्याच्या आत्मचरित्रातून उमगते. माल्कम एक्स अगदी सामान्य पार्श्वभूमी असलेल्या घरात जन्माला आला होता. त्याचे वडील कृष्णवर्णीय बॅप्टिस्ट धर्मगुरू होते. नीग्रोंच्या आयुष्यात सुधारणा व्हावी म्हणून ते प्रयत्न करत होते. अमेरिकन कृष्णवर्णीय दलित स्थितीत आहेत, हे त्यांना उमजले होते. त्यांच्या उज्ज्वल भविष्याविषयी, उत्थानाविषयी त्यांना खात्री होती. कृष्णवर्णीयांची अस्मिता जागवण्याचा ते प्रयत्न करीत होते. कु क्लक्स क्लॅन या गोऱ्यांच्या हिंसक संघटनेच्या लोकांनी त्यांचा व माल्कमच्या चुलत्यांचा खून केला. माल्कमच्या वडिलांचे घरही त्यांनी नष्ट केले. माल्कम त्या वेळी लहान होता. बालपणी घडलेली ही घटना त्याच्या मनात घर करून राहिली.

माल्कम एक्स हे त्यांच्या आईवडिलांचे सातवे अपत्य होते. माल्कमचा जन्म १९ मे १९२५ला झाला. कृष्णवर्णीयांच्या अस्मितेचे बाळकडू त्याला घरातच मिळाले होते. माल्कमच्या वडिलांच्या हिंसक मृत्यूनंतर आपल्या सात मुलांचा उदरनिर्वाह कसा करायचा, त्यांचे पोट कसे भरायचे, त्यांच्या जीवनविषयक अगदी प्राथमिक गरजा कशा भागवायाच्या या विचाराने त्याच्या आईला वेड लागले, तिला इस्पितळात भरती केले गेले. लहान माल्कमवर झालेला हा मोठा आघात होता.

माल्कमला एका कृष्णवर्णीय कुटुंबाने दत्तक घेतले. हार्लेम या नीग्रोबहुल वस्तीत त्याचे बालपण गेले. लहानसहान चोऱ्या करणे, दरवडे घालणे, जुगार खेळणे, दारूच्या दुकानात काम करणे, मादक द्रव्यांची देवघेव करणे, वेश्यांना गिऱ्हाइके पुरवणे अशी अनैतिक कामे तो लहानपणी करू लागला. हार्लेम या वस्तीत नेहमी दंगे होत. त्या वेळी कृष्णवर्णीय लोक गोऱ्या दुकानदारांची दुकाने लुटीत. माल्कमने हे पण पाहिले.

गोऱ्या लोकांतले दुर्गुण त्याने याच ठिकाणी अनुभवले. ड्रायव्हरचे काम करीत असताना त्याने पाहिले, की काही गोऱ्या स्त्रियांना कृष्णवर्णीयांचे लैंगिक आकर्षण होते, तर काही गोऱ्या पुरुषांना कृष्णवर्णीय स्त्रियांचे लैंगिक आकर्षण होते. गुन्हेगारीची ४ वर्षे त्याने हार्लेममध्ये घालवली. अखेरीस वयाच्या २१ व्या वर्षी तो पकडला गेला व त्याला १० वर्षांची शिक्षा झाली. तुरुंगवासाच्या काळात मात्र त्याचे आयुष्यच बदलले. माल्कम फक्त आठवी शिकलेला होता. पण तो इतर कैद्यांसारखा कैदी नव्हता. त्याला चौफेर वाचन करायची मनापासून आवड होती. त्याची जिज्ञासा जागृत होती. तो हुशार होता. अंगभूत हुशारी व चिकाटी बाळगून त्याने तुरुंगातल्या ग्रंथालयातली अवघड पुस्तके वाचली. गंभीर स्वरूपाचे वाचन करण्याची जी संधी त्याला तिथे मिळाली, तिचा त्याने वापर करून स्वतःला समृद्ध बनवले. तत्त्वज्ञाना-सारखा गहन व अवघड विषय व कांट, हेगेल, मार्क्ससारखे श्रेष्ठ विचारवंत त्याला समजू लागले. त्याची बुद्धी व व्यक्तिमत्त्व प्रगल्भ व कुशाग्र बनले. गुन्हेगारी पार्श्वभूमी असलेला माल्कम आता वेगळ्याच व्यक्तिमत्त्वाचा झाला होता.

माल्कमचे मतही पक्के झाले होते. कृष्णवर्णीय अमेरिकन-आफ्रिकन व गोऱ्या अमेरिकनांचे मनोमीलन शक्य नाही; गोऱ्यांचा ख्रिश्चन धर्म कृष्णवर्णीयांचा धर्म होऊ शकत नाही, असे त्याचे ठाम मत झाले होते. सर्वांना समानतेची व न्यायाची वागणूक देणारा इस्लाम कृष्णवर्णीयांचा धर्म असू शकतो, असे त्याला वाटत होते. ख्रिश्चन धर्माविषयीच्या त्याच्या या मतामुळे तुरुंगातले सुरक्षारक्षक त्याला सैतान असे संबोधू लागले.

माल्कमला १९४६ मध्ये १० वर्षांच्या तुरुंगवासाची शिक्षा झाली होती. त्याच्या चांगल्या वागणुकीमुळे ही १० वर्षांची शिक्षा ७ वर्षांची झाली व १९५३ ला तो तुरुंगातुन सुटला. त्याचे तुरुंगाबाहेर असलेले रेजिनाल्ड व फिल्बर्ट हे दोन भाऊ मुस्लीम बनले होते व एलायझा मोहम्मद नेतृत्व करीत असलेल्या नेशन ऑफ इस्लाम या चळवळीत सामील झाले होते. माल्कम तुरुंगात असताना या चळवळीचा नेता एलायझा मोहम्मदबरोबर त्याचा पत्रव्यवहार झाला होता. कृष्णवर्णीयांनी ख्रिश्चन धर्म सोडून इस्लामकडे वळले पाहिजे, असे विचारांती माल्कमचे मत झालेच होते. माल्कमच्या भावांनी त्याला

आणखी पटवून दिले, की माल्कमने मुस्लीम बनून एलायझा मोहम्मदच्या नेशन ऑफ इस्लामचे कार्य करावे. बरेच कृष्णवर्णीय एलायझाला अल्लाचा दूत मानत होते. माल्कम त्या संघटनेत सामील झाला व आपल्या सर्व शक्तीनिशी त्याने संघटनेचे काम केले. एलायझा मोहम्मदचा तो निकटवर्ती बनला.

एलायझा मोहम्मद १९३१ पासूनच कृष्णवर्णीयांच्या प्रश्नात लक्ष घालीत होता. कृष्णवर्णीयांनी इस्लामकडे वळावे, असा प्रचार करीत होता. अशी चळवळ मिशिगन राज्यातल्या डेट्रॉइटमध्ये वालेस डी फार्डने जुलै १९३० मध्ये सुरू केली होती. पण अगदी गूढ रीत्या फार्ड नाहीसा झाला, तेव्हा या चळवळीचे नेतृत्व मोहम्मदकडे १९३४ मध्ये आले.

नेशन ऑफ इस्लाम ही संघटना आफ्रिकन-अमेरिकन लोकांच्या कल्याणासाठी स्थापन झाली होती. पण गोऱ्या अमेरिकन व कृष्णवर्णीय अमेरिकनांचे सहजीवन शक्य नाही, ही भूमिका त्या संघटनेने घेतल्यामुळे त्या संघटनेला गोरे अमेरिकन कृष्णवर्णीय वंशवादी संघटना, ज्यूविरोधी संघटना, संघटित विद्वेष पसरवणारी संघटना असे म्हणत असत.

एलायझा मोहम्मदने मशिदी – किंवा त्यांना तो टेंपल किंवा मंदिरे असे म्हणत असे – स्थापन केल्या. एक शिक्षणसंस्था सुरू करून तिला मोहम्मद युनिव्हर्सिटी ऑफ इस्लाम असे नाव दिले. जागजागी त्या संस्थेने मालमत्ता खरेदी केली व काही उद्योगांतही पैसे गुंतवले. आर्थिक दृष्ट्या सबळ व्हायच्या दिशेने टाकलेले हे पाऊल होते. कृष्णवर्णीयांत ही संघटना, तिची ध्येयधोरणे लोकप्रिय झाली. विशेषतः तरुण कृष्णवर्णीय या संघटनेकडे आकर्षित झाले. माल्कम तुरुंगात असताना एलायझा मोहम्मद व त्याच्यामध्ये झालेल्या पत्रव्यवहारामुळे व तुरुंगात केलेल्या वाचनामुळे माल्कमचे मन तयार झाले व माल्कमला इस्लामधर्म स्वीकारण्याची आवश्यकता पटली. माल्कम तुरुंगातून बाहेर आल्यावर एलायझा मोहम्मदचा निष्ठावंत अनुयायी बनला व संघटनेचा प्रखर प्रचारक बनला.

त्याने तुरुंगातून सुटल्यावर जी नोकरी स्वीकारली होती ती सोडली व तो नेशन ऑफ इस्लाम संघटनेचा पूर्णवेळ कार्यकर्ता बनला. काही काळातच त्याने प्रीस्ट *किंवा मुल्ला* म्हणून दीक्षा घेतली. त्याने कृष्णवर्णीयांत संघटनेचा व तिच्या धोरणांचा जोरदार प्रचार केला. ७ मशिदी किंवा इस्लामधर्माची प्रार्थनास्थळे त्याच्या झंझावाती प्रचाराने स्थापन केली गेली. वयाच्या ३२ व्या वर्षी माल्कमने बेटी या स्त्रीबरोबर लग्न केले. बेटीनेही इस्लामधर्म स्वीकारला होता. ती फारच समजूतदार होती. तिने माल्कमला मनापासून साथ दिली.

याच काळात न्यूयॉर्क पोलिसांनी ब्रदर हिल्टन या कृष्णवर्णीयाला निष्कारण अटक करून मारहाण केली. ब्रदर हिल्टनचे डोक्याचे ऑपरेशन करावे लागले. या प्रसंगी कृष्णवर्णीयांचा मोठा मोर्चा न्यूयॉर्क पोलिस ठाण्यावर काढण्यात आला. त्या मोर्चातील लोकांसमोर माल्कमने जे भाषण केले, त्यामुळे माल्कमचे कृष्णवर्णीयांमधले वजन वाढले. नंतरच्या काही वर्षांत नेशन ऑफ इस्लाम ही संघटना जोरात वाढली. बऱ्याच टेलिव्हिजन कार्यक्रमात तिचा उल्लेख झाला व सहभागही झाला. या संघटनेसंबंधी एक पुस्तकही या काळात प्रसिद्ध झाले. मोहम्मदची नेशन ऑफ इस्लाम ही संघटना सर्वदूर प्रसिद्ध झाली. गोऱ्या लोकांविरुद्ध काम करणारी संघटना, गोऱ्या लोकांचा द्वेष करणारी, ख्रिश्चन धर्मविरोधी असणारी संघटना, काळ्या वंशाचे श्रेष्ठत्व सांगणारी संघटना म्हणून नेशन ऑफ इस्लामची प्रतिमा तयार झाली.

या काळात माल्कमने टी. व्ही. वर मुलाखतीवर व वर्तमानपत्रांतून अनेक मुलाखती दिल्या. त्या मुलाखतींत त्याने गोऱ्या लोकांचा उल्लेख गोरे सैतान – व्हाइट डेव्हिल -असा केला. या मुलाखतींदरम्यान बऱ्याचदा पीएच. डी. करणारे विद्यार्थी त्याच्याबरोबर असत. त्यांचा उल्लेख माल्कम गोऱ्यांची बाहुली – पपेट्स ऑफ द व्हाइट – असा करत असे. एलायझा मोहम्मदची सैद्धान्तिक भूमिका तो मुलाखतींतून स्पष्ट करत असे.

शांततेचा मार्ग कृष्णवर्णीयांना दाखवणाऱ्या, काळ्या-गोऱ्यांचे ऐक्य शक्य आहे अशी भूमिका घेणाऱ्या मार्टिन ल्यूथर किंगसारख्या नेमस्त नेत्यांवर तो समझोता करणारे म्हणून टीका करीत असे. आक्रमक व जहाल कृष्णवर्णीय नेता अशी त्याची व त्याच्या संघटनेची प्रतिमा प्रसारमाध्यमांत व लोकांत बनली होती. आता त्याची संघटना सर्वदूर पसरली होती.









आपल्या स्फूर्तिदायक व वक्तृत्वपूर्ण भाषणांनी माल्कम शहरी काळ्या श्रोत्यांवर प्रभाव टाकत असे. एक नाटकही बऱ्याचदा नेशन ऑफ इस्लामच्या सभांमध्ये केले जाई. ते 'ऑरेग्ना' हे नाटक एका कृष्णवर्णीय मुस्लीम धर्मगुरूने लिहिले होते. काळ्यांचा छळ करणारा गोरा माणूस, त्याच्यावरचा कोर्टातील खटला व त्याला कोर्टाने दिलेली मृत्युदंडाची शिक्षा त्या नाटकात असे. संघटनेचा प्रमुख एलायझा मोहम्मदचा सभास्थळी प्रवेश होण्यापूर्वी वातावरणनिर्मिती म्हणून या सगळ्याचा उपयोग केला जाई. कृष्णवर्णीयांतले काही मूलभूत दोष दूर करण्याचा प्रयत्नदेखील नेशन ऑफ इस्लामने केला. दारू, जुगार, अमली पदार्थांचे सेवन हे दोष काही प्रमाणात कृष्णवर्णीयांत कमी झाले. ते धार्मिक बनले. इस्लामला मान्य असलेली नीतिमत्ता ते पाळू लागले.

गोऱ्या समाजातले काही लोक आत्मपूजक माणूस — डैमॅगॉग — म्हणून माल्कमवर टीका करत. पण माल्कमची भूमिका पक्की होती. तो उदारमतवादी होता. कृष्णवर्णीय वस्त्यांत राहणाऱ्या कृष्णवर्णीयांचे उत्थान झाले पाहिजे; त्यांच्यातले भौतिक, नैतिक, आध्यात्मिक दोष दूर केले पाहिजेत; त्यांची दारू, जुगार, अमली पदार्थसेवन या व्यसनांपासून सुटका झाली पाहिजे; वेश्याव्यवसायासारखे पैसे कमावण्याचे गैर मार्ग कृष्णवर्णीयांनी टाकले पाहिजेत, असे त्याला मनापासून वाटे. हिंसा व तडजोडवाद या दोन्ही मार्गांनी ही उद्दिष्टे गाठता येणार नाहीत, याची त्याला खात्री वाटत होती. मार्टिन ल्यूथर किंगचा वाशिंग्टन मोर्चा त्याला पसंत नव्हता. कृष्णवर्णीयांची संघटना बांधणे, वर्णभेदाला जशास तसे म्हणजेच ठोशास ठोसा या न्यायाने उत्तर देणे; कृष्णवर्णीयांत लोकजागृती करून त्यांच्यात धर्मपरिवर्तन घडवून आणणे; त्यांचे सर्व प्रकारचे उत्थान करणे ही उद्दिष्टे त्याच्यासमोर होती.

याच काळात नेशन ऑफ इस्लामचा मुख्य नेता एलायझा मोहम्मद १९६४ मध्ये आजारी पडला व हवापालटासाठी त्याला अमेरिकेबाहेर जावे लागले. माल्कम आता नेशन ऑफ इस्लाम ही संघटना ताब्यात घेईल, अशा अफवा पसरवल्या गेल्या. एलायझा मोहम्मदच्या अनैतिक वागण्यासंबंधी व आर्थिक गैरव्यवहारांसंबंधी माल्कमला याच काळात कळले. एलायझा मोहम्मदच्या वागण्यासंबंधीच्या अफवा खऱ्या आहेत का, याची माल्कमने खात्री पटवून घेतली व मगच त्याच्या बरोबर काम करणे शक्य नाही, असा निर्णय त्याने घेतला. एलायझा मोहम्मदला त्याने पत्र लिहिले व त्या अफवांच्या खरेपणाविषयी विचारले. एलायझा मोहम्मदने त्याला संघटनेमधून बाहेर हाकलले. त्याच्याविरुद्ध फतवा काढला. त्याला मरणाचे भय दाखवले. पण माल्कम आपल्या भूमिकेबद्दल ठाम राहिला.

हा मोठ्या अडचणीचा, परीक्षेचा क्षण होता. जवळची माणसे व साधने कमी होती. या अडचणीच्या वेळी कॅशिअस क्ले या जगजेत्या कृष्णवर्णीय मुष्टियोद्ध्याने त्याला धीर दिला. मदत केली. मानसिक दृष्ट्या त्याला आधार दिला.

माल्कमने आता कृष्णवर्णीयांचे नवे संघटन सुरू केले. न्यूयॉर्कमध्ये नवी मशीद म्हणजे नवे प्रार्थनास्थळ त्याने उभे केले. अमेरिकेतल्या २ कोटी २० लाख कृष्णवर्णीयांची त्याला काळजी होती. त्यांच्यात आत्मसन्मानाची भावना निर्माण व्हावी म्हणून तो सारा खटाटोप करीत होता, त्याच्या प्रयत्नांची तीच दिशा होती. त्या सर्वांचे नैतिक व आध्यात्मिक उत्थान व्हावे, असे त्याला वाटत होते. त्याने धार्मिकतेच्या भावनेतून मक्कायात्रा करायचे ठरवले. त्याच्या बहिणीने – एलाने – या यात्रेचा आर्थिक भार उचलला. मक्कायात्रेचे पवित्र काम करून तो हाजी बनणार होता. अमेरिकेतल्या सर्व कृष्णवर्णीयांच्या वतीने ही वारी तो करणार होता. या मक्कायात्रेमुळे कृष्णवर्णीयांच्या उत्थानासंबंधी हिंसक मार्गाच्या वैधतेसंबंधीचा त्याचा दृष्टिकोणही बदलणार होता. मक्कायात्रेत तो मोठ्या भक्तिभावाने सामील झाला. त्या यात्रेत त्याला भावासारखे प्रेम देणारे अनेक धार्मिक मुस्लीम भेटले. डॉ. आझम या सज्जन गृहस्थांनी तिथल्या मुक्कामात त्याला सर्व प्रकारची मदत केली. त्याला उंची हॉटेलमध्ये ठेवले, घरी मोठे जेवण दिले. सौदी अरेबियाच्या राजवाड्यात माल्कमला जेवणासाठी बोलावले गेले ते त्यांच्याच ओळखीमुळे. प्रिन्स फैजलने त्याला स्टेट गेस्ट म्हणून घोषित केले. टी. व्ही. वर व वर्तमानपत्रांतून त्याच्या मुलाखती घेतल्या गेल्या. त्याची

मक्काभेट फार गाजली. बैरूत, नायजेरिया, घाना या देशांनी माल्कमला स्टेट गेस्ट म्हणून बोलावले. चीनच्या वकिलाने त्याला सन्मानपूर्वक डिनर दिले. मक्कायात्रेसाठी बहिणीकडून आर्थिक मदत घ्यावी लागलेल्या माल्कमचा फार मोठा सन्मान झाला होता. एका मुलाखतीत त्याने स्पष्टपणे व अगदी मोकळेपणाने म्हटले, की तो अमेरिकाविरोधी नाही व गोऱ्या अमेरिकनांविरुद्धही नाही; त्याची भूमिका वर्णभेद पाळला जाऊ नये व कृष्णवर्णीयांना समतेची, न्याय्य वागणूक मिळावी, अशी आहे. त्याची चळवळ व लढा त्याचकरिता आहे. त्याची मानवतावादी भूमिका कोठल्याही मानवतावादी व समतावादी माणसाला पटण्यासारखी बनली होती व ती दीर्घ विचाराने व अनुभवाने बनली होती, हे स्पष्ट आहे.

तो जेव्हा मक्काभेटीहून परत यायला निघाला, तेव्हा घाना देशामधल्या अक्रा या विमानतळावर त्याला निरोप देण्यासाठी ५ देशांचे वकील आले होते. अक्राहून माल्कम डाकोर, सेनेगल, मोरोक्को व अल्जेरिआ या देशांना गेला. २१ मे १९६४ ला तो अमेरिकेत परत आला. मधल्या काळात अमेरिकन प्रसारमाध्यमांनी त्याची खलनायक किंवा व्हिलन अशी प्रतिमा निर्माण केली होती. माल्कमने अमेरिकेला परतल्यावर ही प्रतिमा बदलण्याचा, सुधारण्याचा जोराने प्रयत्न केला. अनेक वार्ताहर परिषदांमधून त्याने आपली भूमिका स्पष्ट केली; मक्कायात्रेचे नीट वर्णन केले; वार्ताहरांनी विचारलेल्या प्रश्नांना हुशारीने उत्तरे दिली; आपली प्रतिमा योग्य रीतीने सादर व्हावी म्हणून त्याने जे प्रयत्न केले, ते बऱ्याच प्रमाणात यशस्वी झाले.

रागावलेला व कृष्णवर्णीयांना हिंसा शिकवणारा माल्कम अशी त्याची प्रतिमा बऱ्याच प्रमाणात बदलली. त्याने अमेरिकन लोकांना आठवण करून दिली, की अमेरिकेचा जन्मच मूळ निवासी असलेल्या अमेरिकन इंडियनांचा वंशविच्छेद करून झाला आहे. आजवर गोरे अमेरिकन व कृष्णवर्णीय अमेरिकन सहकाराने, शांतपणे एकत्र राहिले नाहीत. त्यांचे नाते शोषक व शोषित असेच राहिले आहे. ते बदलायला पाहिजे, असे त्याला वाटत होते. धर्मांतर व आत्मसन्मानासाठी, समानतेसाठी, न्यायासाठी लढणे हाच रस्ता त्याला दिसत होता व तेच तो अमेरिकन कृष्णवर्णीयांना सांगत होता, शिकवत होता. नेशन ऑफ इस्लाम या मोहम्मदच्या संघटनेने तर त्याला बाहेर घालवले होते.

माल्कमने स्वतःची द *ऑर्गनायझेशन ऑफ आफ्रो-अमेरिकन युनिटी* ही संघटना स्थापन केली. मार्टीन ल्यूथर किंग या सनदशीर व शांततामार्गाने जाणाऱ्या पुढाऱ्याविषयी त्याचे आधीचे मत त्याने बदलले. मार्टिन ल्यूथर किंगच्या गाजलेल्या वॉशिंग्टन मार्चबद्दल पूर्वी त्याने आपले विरोधी मत नोंदवले होते. पण आता त्याचे मत बरेच मवाळ झाले होते.

आपला आक्रमक मार्ग हाच एकमेव मार्ग नाही, हे तो समजून चुकला होता. मार्टिन ल्यूथर किंगच्या वॉशिंग्टन मार्चमुळे वंशवादाकडे लक्ष वेधले गेले; कृष्णवर्णीयांना आजवर जे सहन करावे लागले ते जगासमोर आले; कृष्णवर्णीयांच्या यातना नाट्यपूर्ण रीतीने (ड्रॅमाटाइझ) सादर झाल्या, हे त्याने मान्य केले. मार्टिन ल्यूथर किंगच्या प्रयत्नामागे असलेली सकारात्मक बाजू त्याच्या लक्षात आली. मार्टिन ल्यूथर किंगची व माल्कमची भेट एकदाच झाली. त्या वेळी आपले मार्ग जरी भिन्न असले तरी ध्येय एकच आहे, हे त्याने स्पष्ट केले. आपले भविष्यही एकच व शोकांतिक आहे, हे तो समजला होता. कोणताही माथेफिरू गोरा किंवा विकला गेलेला कृष्णवर्णीय आपल्याला संपवू शकेल, हे त्याला माहीत होते; त्या शक्य घटनेविषयी त्याच्या मनात शंका होती. आजवरच्या इतिहासात स्थितिप्रिय सनातनी समाज समाजसुधारकांना संपवतो हा इतिहास आहे, याची त्याला स्पष्ट जाणीव होती.

गोऱ्या लोकांचा द्वेष करणारा बेजबाबदार माल्कम अशी आपली प्रतिमा मृत्यूनंतर उभी केली जाईल, असे त्याला वाटत होते. त्याच्या संवेदनशील मनाला हे पटत नव्हते. अभ्यासू, हळुवार मनाच्या माल्कमला आपली सार्वजनिक प्रतिमा चांगली असावी असे वाटणे अगदी योग्यच होते. माल्कम व्यक्तीचा व्यक्ती म्हणून आदरच करीत होता. ज्या गोऱ्या लोकांनी त्याला माणसाप्रमाणे वागवले, प्रेमाने वागवले, त्यांच्याविषयी तो कृतज्ञच राहिला. दोन वंशांतल्या लोकांचे परस्परसंबंध ही मूलतः व्यक्तिगत बाब आहे, हे त्याला माहीत होते. तरीही जगात वंशभेद

पाळला जातो हे त्याला खटकत होते; त्यामुळे तो दुखावला जात होता. गोऱ्या लोकांविषयी ती गोरी माणसे म्हणून त्याला राग नव्हताच. वंशभेद पाळणारे जे गोरे लोक होते, त्यांच्याच विरोधी त्याची भूमिका होती.

या काळात मोहम्मदच्या नेशन ऑफ इस्लाममधून त्याला बाहेर काढले गेले होते; त्याच्यावर अनेक जीवघेणे प्रसंग या काळात ओढवले. त्यांतला एक प्रसंग असा होता – एलायझा मोहम्मदच्या वर्तनाची खात्री करून घेण्यासाठी तो मोहम्मदच्या लॉस एन्जेलीस ऑफिसमध्ये गेला होता. तो राहत असलेल्या हॉटेलला मोहम्मदच्या अनुयायांनी गराडा घातला होता. हॉटेलच्या आपल्या खोलीत तो लॉबीमधून पळतच गेला व खोलीबाहेर दिवसभर बाहेर पडला नाही. तो विमानतळाकडे निघाला, तेव्हा दोन कारनी त्याचा पाठलाग केला. त्याने मित्राची काठी घेऊन पाठलाग करणाऱ्या कारमधील लोकांवर ती बंदुकीसारखी रोखली. पोलिस संरक्षणातच तो लॉस एन्जेलीसला विमानात चढला. शिकागोला विमानातून उतरून पोलिस संरक्षणातच तो आपल्या हॉटेलकडे गेला.

या त्याच्या शेवटच्या कालखंडात त्याची अग्निपरीक्षाच होत होती. कृष्णवर्णीयांना आत्मसन्मान मिळावा म्हणून तो धडपडत होता; जोराने इस्लामचा प्रचार करीत होता; दूरदूर जाऊन भाषणे देत होता; वार्ताहर परिषदांत, टी. व्ही. वरच्या मुलाखतीत आपली भूमिका समजावून देत होता, स्पष्ट करीत होता व त्याच वेळी मृत्यूच्या छायेत तो वावरत होता. या सगळ्याचा शेवट व्हायचा होताच.

हार्लेम शहरातल्या कृष्णवर्णीय वस्तीतल्या ओडबॉन (Audabon) बॉलरूममध्ये त्याने भाषण दिले. तो दिवस २१ फेब्रुवारी १९६५ हा होता. त्या दिवशी हार्लेमच्या त्या बॉलरूममध्ये दोन भाडोत्री मारेकऱ्यांनी माल्कमवर गोळ्या झाडून त्याचा खून केला.

कृष्णवर्णीयांना आत्मसन्मानाची, अभिमान, स्वसंरक्षणाची शिकवणूक देणारा, त्यांना नवी व योग्य दृष्टी देणारा, आपली मूळ भूमिका कधीही न बदलणारा, निःस्वार्थी व स्पष्ट भूमिकेचा माल्कम मारला गेला; पण त्याने कृष्णवर्णीयांना जे शिकवले, ते दीर्घकाळ टिकणारे होते. त्याच्या मृत्यूनंतर अनेक वर्तमानपत्रांनी व टी. व्ही. चॅनल्सनी त्याला कृष्णवर्णीयांचा मोठा पुढारी म्हणून श्रद्धांजली वाहिली.

माल्कम कृष्णवर्णीयांतला मोठा पुढारी होता. वर्णभेद पाळण्याची प्रथा त्याला अमान्य होती. समानता, न्याय, मानवता ही मूल्ये नव्या युगाची मूल्ये आहेत व वर्णभेद कालबाह्य झाला आहे, याची त्याला खात्री होती. त्याच उद्देशाने त्याने अमेरिकन कृष्णवर्णीयांचे संघटन केले. त्यांच्या चळवळी चालवल्या. त्यात त्याचा काही वैयक्तिक लाभाचा हेतू नव्हता. प्रामाणिक हेतूने, कृष्णवर्णीयांच्या सार्वत्रिक हिताच्या दृष्टीने त्याने हे सारे केले. एक सामान्य माणूस, गुन्हेगारी पार्श्वभूमी असलेला अल्पशिक्षित माणूस उद्दात्त हेतू असल्याने महत्त्वाचे कार्य करू शकतो, हेच त्याच्या आत्मचरित्रातून स्पष्ट होते. तो जे जीवन जगला, त्याचे अत्यंत पारदर्शी दर्शनच त्याच्या आत्मचरित्रातून दिसते. तो कार्यकर्ता व पुढारी होता. लेखकाला आवश्यक असणारा वेळ व सवड त्याच्याकडे नव्हती. त्याचे शब्दावर प्रभुत्व होते का, याविषयी आपण फक्त तर्कच करू शकतो. त्याने आर्थर हेली या त्या वेळी उमेदवारी करणाऱ्या लेखकाला आत्मचरित्राचे शब्दांकन करायला दिले व त्यामुळेच हे आत्मचरित्र त्याच्या अकाली झालेल्या खुनानंतर प्रकाशित होऊ शकले. त्या पुस्तकाचे प्रकाशन हे वाचकांच्या दृष्टीने स्वागतार्ह ठरले, हे त्या पुस्तकाच्या खपावरून, अनेक भाषांत झालेल्या भाषांतरांवरून व त्या पुस्तकाला मिळालेल्या एकूणच प्रतिसादावरून सिद्ध होते. २० व्या शतकातल्या श्रेष्ठ पुस्तकांत त्या पुस्तकाची गणना केली जाते. कृष्णवर्णीयांचा २० व्या शतकातला लढा व त्याचे अनेक रस्ते त्या पुस्तकात आपल्याला दिसतात. मानवी स्वातंत्र्याचा, समतेचा लढा ज्या काटेरी मार्गातून वाटचाल पुढे चालू ठेवतो, त्याचे भान आपल्याला येते, हे त्या पुस्तकाचे यश मानावे लागेल.

## ब्लॅक पँथर व दलित पँथर

माल्कम एक्सच्या या चळवळीनंतर १९६६ ते १९८२ या काळात अमेरिकन कृष्णवर्णीयांत ब्लॅक रेवोल्यूशनरी सोशलिस्ट ऑर्गनायझेशन ही चळवळ झाली. बॉबी सील (Bobby Seale) व ह्यू न्यूटन (Huey Newton) या दोघांनी कॅलिफोर्नियातल्या ओक्लंड (Oakland) या






ठिकाणी १५ ऑक्टोबर १९६६ ला ह्या चळवळीची स्थापना केली. पोलिसी अत्याचारांपासून कृष्णवर्णीयांना, त्यांच्या वस्त्याना वाचवणे हा या चळवळीचा मूळ उद्देश होता. द ब्लॅक पँथर हे या चळवळीचे मुखपत्र १९६९ ला प्रथम वितरीत करण्यात आले. त्या वर्तमानपत्राच्या अगदी थोड्या काळात २ लाख ५० हजार प्रती संपू लागल्या. ब्लॅक रेव्होल्यूशनरी सोशलिस्ट ऑर्गनायझेशन या पक्षाची सभासदसंख्या १९६९ मध्येच १० हजार झाली होती. म्हणजे हा पक्ष व त्याचे मुखपत्र कृष्णवर्णीयांत लोकप्रिय झाले. काळाची गरज अशा रीतीने पुरी केली गेली.

सर्व जगभर १९६० च्या दशकात या संघटनेकडे व या संघटनेच्या मुखपत्राकडे प्रतिसंस्कृतीचा (counterculture) नमुना म्हणून पाहिले जाऊ लागले. अमेरिकन सरकारच्या शासनयंत्रणेने आपल्या दमनयंत्रणा उपयोगात आणल्या व या चळवळीचे महत्त्व कमी करण्याचा प्रयत्न केला. एफ. बी. आय. (FBI) सारख्या सरकारी यंत्रणांनी गुप्त पाळत ठेवणे, संघटनेमध्ये शिरकाव करून घेणे, चळवळीसंबंधी अफवा पसरवणे, पोलिसांकडून चळवळीतल्या लोकांचा निष्कारण छळ करणे असे सर्व सूक्तासूक्त मार्ग अवलंबले. अखेरीस १९८६ मध्ये ही चळवळ पूर्ण थंडावली व या संघटनेचे फक्त २७ सदस्य राहिले. पण मध्यंतरीच्या काळात या चळवळीने जगभरच्या शोषित, दलित व पीडित माणसांना स्फूर्ती व धीर दिला होता. अन्यायाविरुद्ध आपण आता लढू शकतो व अन्याय दूर होऊ शकतो, हे या चळवळीच्या वाटचालीवरून त्यांना समजले होते. अमेरिकन कृष्णवर्णीयांना त्यांचे मानवी हक्क मिळवण्यासाठी गतइतिहासातल्या चळवळींबरोबर व वर्तमानातल्या इतर प्रयत्नांबरोबर ही चळवळही कारणीभूत ठरली होती. ब्लॅक पँथर हे नाव सर्व ठिकाणी पोचले होते. ब्लॅक पँथरची चळवळ जरी थंडावली व जवळजवळ संपली, तरी चळवळीचा परिणाम झालाच होता.

जगातल्या वेगवेगळ्या ठिकाणी जो वंशभेद पाळला जात असे, तो अमेरिकेतल्या कृष्णवर्णीयांच्या चळवळीमुळे काही प्रमाणात कमी झाला, हे या चळवळीचे फार मोठे यश आहे. महाराष्ट्रात दलित पँथरची चळवळ सुरू होण्यामागे कृष्णवर्णीयांच्या चळवळीची प्रेरणा होती, हे सर्वांनीच मान्य केले आहे.

ब्लॅक पँथर हे मुखपत्र असणारी अमेरिकन कृष्णवर्णीयांची चळवळ व महाराष्ट्रातील दलित पँथर चळवळ यांत काही साम्ये होती व काही भेदही होते. वंशभेदप्रश्न भारतात नव्हता; पण अस्पृश्यता, शिवाशीव, धर्मरूढी, जातिव्यवस्था, काही गोष्टी काहीच जातींनी करण्याची रूढ म्हणजे शतकानुशतकांची पद्धती या खटकणाऱ्या बाबींबद्दल सवर्णांतल्या अनेक समाजसुधारकांनी आपले वैयक्तिक नुकसान लक्षात येऊनही १९ व्या शतकात आवाज उठवला होता. त्या रूढींना काहीच शास्त्राधार नाही, असे काहींनी दाखवले होते; तर काहींनी बुद्धिवाद हे आधुनिक शस्त्र वापरले होते. तर काहींनी त्यासाठी चळवळी उभारल्या. हे सर्व नव्यानेच होत होते. त्यामुळे सुधारकांची दिशा योग्य असली, तरी त्यांना त्या वेळी अत्यल्प पाठिंबा मिळाला. २० व्या शतकात मात्र जनजागृती मोठ्या प्रमाणात झाली. महात्मा गांधी व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारख्यांनी हा प्रश्न हाती घेतला. आंबेडकरांनी तर त्यासाठी तळमळीने आपले उभे आयुष्य वेचले. अस्पृश्यतानिवारणाचा कायदा अस्तित्वात आला व शिक्षणात आणि नोकऱ्यांत राखीव जागांची तरतूद कायद्याने करण्यात आली. आज काही प्रमाणात अस्पृश्यता अस्तित्वात आहे; पण कायद्याने तिला मान्यता नाही.

समानता, न्याय व मानवी हक्क या तीन मानवी मूल्यांचा पुरस्कार भारतीय राज्यघटनेने केला, हे मोठे काम झाले. घटनेतल्या तरतुदींनुसार समाजव्यवहार कायदा झाल्यानंतरही होत नव्हता, म्हणून दलित पँथरसारख्या चळवळी उभ्या राहिल्या.

डॉ. आंबेडकरांनी स्थापन केलेला रिपब्लिकन पक्ष १९६० च्या दशकात अनेक फळ्यांत विभागला गेला होता. तो दलितांवरचा अत्याचार, त्यांचे शोषण यांविरुद्ध आवाज उठवण्यात पुरेसा समर्थ नव्हता. अमेरिकेतल्या कृष्णवर्णीयांच्या चळवळीचे उदाहरण समोर होते. डॉ. आंबेडकरांनी दाखवलेल्या मार्गाने जायचे हा निर्धार दलित तरुणांत होता. मग त्या तरुणांनी ९ जुलै १९७२ ला एकत्र येऊन दलित पँथर या संघटनेची मुंबईतल्या एका सभेत स्थापना केली.










तात्कालिक कारण राजा ढाले या त्या वेळी तरुण असलेल्याचा लेख हे होते. हा लेख साधना या साप्ताहिकात प्रसिद्ध झाला. साधना साप्ताहिक समानता, न्याय, मानवता या मूल्यांचा पुरस्कार करणारे, समाजजागृतीचा मार्ग हाताळणारे, त्यागाने चालवले जाणारे साप्ताहिक म्हणून प्रसिद्ध होते व आहे. २५ वर्षांच्या स्वातंत्र्यानंतरही दलितांची सामाजिक स्थिती सुधारली नाही, तेव्हा हे स्वातंत्र्य दलितांचे स्वातंत्र्य असू शकते का, असा प्रश्न राजा ढालेंनी त्या लेखात दाहक व जहाल शैलीत विचारला होता. त्यावर नंतर बरीच वादावादी झाली. दलित प्रश्नाविषयी सहानुभूती बाळगणाऱ्या लोकांनाही ती शैली आवडली नव्हती.

काही काळाने दलित पँथर या चळवळीची स्थापना झाली. दलित पँथर ही चळवळ माल्कम एक्सच्या चळवळीप्रमाणे होती. ती प्रतिकारावर भर देणारी चळवळ होती. तिचे तत्त्वज्ञान हिंसेचे नव्हते, पण ती नेमस्त व शांततावादी चळवळही नव्हती. अर्ज, विनंत्या असे नेमस्त मार्ग या चळवळीतल्या तरुणांना मान्य नव्हते. अन्यायाचा प्रतिकार करणे हा त्या चळवळीचा गाभाच होता.

स्वसंरक्षणाची व उच्चवर्णीय वाद किंवा ब्राह्मण-वादाला शह देण्याचे काम या चळवळीने केले. 'अरे' ला 'कारे' असे उत्तर द्यायची मानसिकता दलित तरुणांत रुजवण्याचे ऐतिहासिक काम या चळवळीने केले. राजा ढाले व नामदेव ढसाळ हे दलित पँथरचे संस्थापक व अध्वर्यू होते. या चळवळीचा पहिला मोर्चा वरळी मोर्चा म्हणून गाजला. दलित पँथर या चळवळीला वैचारिक अधिष्ठान होते. गौतम बुद्ध, डॉ. आंबेडकर, शाहूमहाराज, मार्क्स, चे गेव्हारा व अस्तित्ववाद यांचे तत्त्वज्ञान या चळवळीपाठीमागे होते. म्हणजे दलित पँथरची वैचारिक बाजू पक्की होती. सनातन मत त्यामुळे वैचारिक दृष्ट्या त्याचा सामना करण्यास असमर्थ होते.

केवळ तीन वर्षे दलित पँथर चळवळीला विस्तारायला, रुजायला मिळाली. शिवसेना, साम्यवादी पक्ष व सत्ताधारी काँग्रेस पक्ष या तीन पक्षांना दलितांची ताकद काय आहे, हे कळले. या चळवळीतले बरेच दलित तरुण माटुंगा लेबर कँप, बी. डी. डी. चाळी, सात रस्ता, माझगाव या मुंबईतल्या गरीब वस्त्यांत व अनेक झोपडपट्ट्यांत राहत होते. ते सर्वजण संघटित होऊन त्यांच्यात वैचारिक कृती करण्याची मानसिकता तयार झाली. दलित पँथरचा कँप 'छावणी' म्हणून प्रसिद्ध होता.

पण लवकरच या चळवळीला ओहोटी लागली व त्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे चळवळीच्या राजा ढाले व नामदेव ढसाळ या दोन मुख्य नेत्यांमध्ये वैचारिक व संघटनेच्या प्रश्नासंदर्भात फूट पडली. राजा ढालेंनी बौद्ध धर्म व आंबेडकरवाद यांचा पुरस्कार केला, तर नामदेव ढसाळ प्रथम साम्यवादी पक्षाकडे व नंतर शिवसेनेकडे ओढले गेले.

दलित पँथरची स्थापना होऊन ऑगस्ट २०१३ ला चाळीस वर्षे झाली. त्यानिमित्त अनेक वर्तमानपत्रांनी व मासिकांनी लेख प्रसिद्ध केले; काही विशेषांकही प्रसिद्ध केले गेले. इतिहासातली दलित पँथर ही मोठी घटना होती. प्रसारमाध्यमांनी तिला चाळीस वर्षे झाली या घटनेची योग्य दखल घेतली. महाराष्ट्रात जनजागृती करण्याचे ऐतिहासिक काम या चळवळीने केले. ही जनजागृती महाराष्ट्राबाहेर पोचली. भारतातला दलित जागा झाला.

**संदर्भ –**


१) Malcolm X and Arthur Haily. *The Autobiography of Malcolm X.*, New York : Ballantine Books, 1999. (First published by Grover Press, New York in 1965).

२) लोकसत्ता, ७ जुलै २०१३, रविवार पुरवणी, लोकरंग, पा. १ व ३.

३) इंटरनेटवरचे अनेक संदर्भ.


***

# अंधश्रद्धा-रूढी-परंपरांच्या मानसिक गुलामगिरीतून 'भारत महान राष्ट्र कसे होऊ शकेल?'

भगवान माने

**प्रस्तावना**

आद्य शंकराचार्यांच्या अद्वैत परंपरेमुळे भारतीय समाज रूढी, परंपरा, कर्मकांड आणि दैववादी विचारपरंपरेत अडकून पडलेला होता. वर्णव्यवस्थेच्या बंदिस्त कप्प्यामुळे समाजाच्या प्रगतीला खीळ बसली होती. परंतु तथागत गौतम बुद्धांनी निसर्गातील घटनांकडे विवेकाने पाहण्याची दृष्टी दिल्यामुळेच हजारो वर्षांच्या रूढी-परंपरेच्या गुलामगिरीतून मानवसमाज मुक्त झाला. भारतात सामाजिक-धार्मिक सुधारणा करण्यामध्ये संत, महापुरुष आणि सामाजिक सुधारकांचे योगदान महत्त्वाचे असले, तरी या चळवळी दैवी सिद्धान्ताच्या पलीकडे जाऊ शकल्या नाहीत. जातिधर्मानुसार संतांचे कबिले तयार झाले. त्यामुळे अखंड मानवमुक्तीच्या कार्यात अडथळे निर्माण झाले. प्रबोधनाच्या चळवळीने विवेकनिष्ठ पद्धतीकडे काणाडोळा केल्याने समाजाच्या प्रगतीला आणि विवेकनिष्ठ समाजनिर्मितीमध्ये अडथळा निर्माण झाला हे खरे असले, तरी महात्मा बसवेश्वर, संत कबीर, संत गाडगेमहाराज, महात्मा ज्योतीबा फुले यांच्या कार्यामुळे समाजाला विवेकनिष्ठ जीवनाची प्रेरणा मिळाली.

मानवी इतिहासामध्ये युरोपमधील चौदाव्या आणि सोळाव्या शतकाचा काळ हा पुनर्जागृती, धर्मसुधारणा किंवा प्रबोधनाचा कालखंड म्हणून ओळखला जातो. 'प्रबोधन' या मराठी शब्दाला इंग्रजीत 'रेनिसान्स' असे म्हणतात. त्याचा अर्थ 'पुनर्जन्म' असा आहे. सुरुवातीला ग्रीक आणि रोमन संस्कृतीमधील नवनिर्मितीबद्दल मर्यादित अर्थाने त्याचा वापर केला जात असे. परंतु पुनर्जागृतीच्या काळात कला, साहित्य, धर्म, तत्त्वज्ञान, शिल्पकला, अध्यात्म, अर्थकारण, राजकारण, विज्ञान इत्यादींची पुनर्मांडणी करण्यात आली. इटलीचे पेट्रार्क व बोकॅशिओ, फ्रान्सचा रेबले, हॉलंडचा इरॅस्मस, जर्मनीचा वॉन ह्युटेन, स्पेनचा सर्वान्टीस आणि इंग्लंडचा शेक्सपियर यांच्या साहित्यामधून धर्म, करुणा, देहदंडाऐवजी रूढी-परंपराच्या विरोधी भावना तीव्रतेने व्यक्त होतात. पुनर्जागृतीच्या काळात विज्ञानाचा अर्थ समजून सांगण्याचा अनेकांनी प्रयत्न केला. विज्ञान आणि धर्माची चिकित्सा करण्यात आली. त्या वेळी तत्कालीन विचारवंतांचा अनन्वित छळ करण्यात आला. ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकातील ग्रीक विचारवंत सॉक्रेटिसला विषाचा प्याला देण्यात आला. कोपर्निकस (१४७३-१५४३), गॅलिलिओ (१५६४-१६४२), ब्रूनो (१५४८-१६००), बेकन (१५६१ -१६२५), डेस्कार्टिस (१५९६-१६४०) यांनी वैज्ञानिक सत्य सांगण्याचा प्रयत्न केला, त्या वेळी कडाडून विरोध करण्यात आला. यावरून असे स्पष्ट होते, की भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळातील प्रथा, परंपरा आणि परिवर्तन एका तणावाच्या अवस्थेत आढळते. म्हणून परिवर्तन उत्क्रांतिवादी असो अथवा क्रांतिकारी असो, त्यासाठी मानवी मनामध्येच परिवर्तनाची इच्छा असावी लागते. भूतकाळातील संबंधित भाग म्हणजे आपल्या सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक आशा-आकांक्षेपुढील अडथळे आहेत, अशी धारणा बनू लागते. आणि मग परिवर्तनाला पोषक नसणाऱ्या भूतकाळाचे पाश तोडण्यासाठी वैज्ञानिक विचारधारेतून हजारो वर्षांची गुलामगिरी नाकारण्याचा प्रयत्न केला जातो. परंतु जे विज्ञानाच्या कसोटीवर सिद्ध झाले, ज्याची सत्यासत्यता पारखता येते, ते सर्व नाकारायचे आणि जे सिद्ध करता येत नाही ते श्रद्धेच्या नावावर स्वीकारायचे, अशी समाजाची धारणा आहे. आधार आणि पुराव्यासंबंधी इतकी बेपर्वाई का दाखविली जाते? हे समजून येत नाही. वास्तविक देशाच्या सर्वांगीण प्रगतीसाठी धैर्य, शिस्त, चिकित्सा, विवेक यांची आवश्यकता असताना, प्रच्छन्न स्वार्थासाठी लागणारे धैर्य आणि कर्मकांडासाठी लागणारी शिस्त मात्र आपल्याकडे भरपूर आहे. अशा वेळी पारंपरिक समाजात परिवर्तन आणण्याची प्रक्रिया अधिक गुंतागुंतीची होते. म्हणून समाजामध्ये विवेक निर्माण करण्याची

आवश्यकता असते. विवेकासंबंधी गौतम बुद्ध असा उपदेश करतात, की "कशावरही विश्वास ठेवू नका, कोणीतरी तुम्हाला सांगितले म्हणून किंवा ते रूढीला धरून आहे, म्हणून विश्वास ठेवू नका, किंवा तुमच्या कल्पनेची भरारी म्हणून वाटणाऱ्या गोष्टीवर विश्वास ठेवू नका; गुरूवरील नितान्त श्रद्धेमुळे गुरूने सांगितलेल्या गोष्टीवरही विश्वास ठेवू नका. नीट अभ्यास आणि चिकित्सा केल्यावर सर्वसमाजाला हितकारक ठरेल असे जे तुम्हाला वाटेल, तेच तुमचे एक मार्गदर्शक तत्त्व म्हणून स्वीकारा." यावरून असे स्पष्ट होते, की अखंड मानवजातीच्या कल्याणासाठी बुद्धांचा उपदेश हे वैश्विक सत्य आहे.

**वैज्ञानिक दृष्टिकोनाची ऐतिहासिक पार्श्वभूमी :**

मानव हा विचार करणारा प्राणी असून मानवाने निसर्गातील निरीक्षणाद्वारे अनेक कला अवगत केल्या. उत्क्रांती-अवस्थेत हत्यारे तयार करणे, वस्तूंचा कौशल्याने वापर करण्याचे कसब, कौटुंबिक संबंध आणि विचार करण्याच्या पद्धतीमुळे तो इतर प्राण्यांपेक्षा वेगळा ठरतो. मानवाने सुमारे दहा हजार वर्षांपूर्वी मर्यादित प्रमाणात शेतीस प्रारंभ केला, त्यानंतर त्याच्या स्थिर जीवनाची सुरुवात झाली. परंतु मानवाने अद्यापही निसर्गचक्राचे ज्ञान ग्रहण केले नसल्याने विजेचा गडगडाट, विजेमुळे लागलेल्या आगी, त्यामध्ये होणारी जीवितहानी इत्यादी घटना मानवाला अनाकलनीय होत्या. सूर्यग्रहणामुळे भरदिवसा पडणारे काळोख आणि चंद्रग्रहणावेळी चांदणे लुप्त होणे, यामुळे तो आश्चर्यचकित होत असे. परंतु कालमानानुसार मानवाची विचारशक्ती विकसित झाल्याने तो सभोवतालच्या घटनांमध्ये अधिक रस घेऊ लागला. निरीक्षण, माहिती, घटनांबाबत अवलोकनाद्वारे स्वतःलाच प्रश्न विचारू लागला आणि याच वेळी विज्ञान आणि वैज्ञानिक दृष्टिकोनाची खरी सुरुवात झाली.

विज्ञान एक मानवी प्रयत्न असून प्राचीन काळापासून मानवाने आपल्या आत्मकल्याणासाठी निसर्गावर प्रभुत्व मिळविण्याचा प्रयत्न केला आहे. विज्ञान म्हणजे निसर्गाला समजून घेऊन निसर्गावर नियंत्रण ठेवण्यासाठी अर्जित ज्ञानाचा उपयोग करणे आणि ज्ञानाचा शोध, बोध व रचना असा त्याचा अर्थ आहे. वास्तविक विज्ञान आणि तंत्रज्ञानामध्ये फरक आहे; कारण वैज्ञानिक युगाच्या अगोदर शास्त्रीय ज्ञान होते, परंतु शास्त्रीय ज्ञानाला जेव्हा निरीक्षण, प्रयोग आणि परीक्षण यांचा आधार देण्यात आला, तेव्हा शास्त्रीय ज्ञान वैज्ञानिक होऊ लागले. अनेक वेळा विज्ञान या संकल्पनेचा सवंगतेने वापर केला जातो. विज्ञानाचा विविध प्रकारच्या उत्पादन आणि उपकरणांशी संबंध जोडला जातो. विज्ञानामुळे अनेक उपकरणांची निर्मिती होते, हे जरी वास्तव असले तरी, विज्ञान म्हणजे केवळ उपकरणे नव्हेत आणि विज्ञान व तंत्रज्ञान एकच मानणे चुकीचे ठरते. जसे मंदिर म्हणजे धर्म नव्हे आणि वास्तुशास्त्राचा आराखडा म्हणजे इमारत नव्हे, त्याचप्रमाणे विज्ञान व तंत्रज्ञानाची स्थिती आहे. विज्ञानाची विविध रूपे आहेत. विज्ञान उपकारक आणि हानिकारकही आहे. म्हणून ज्ञानाचा वापर वैज्ञानिक किंवा विवेकबुद्धीने केला, तर समाजपरिवर्तनास निश्चितच फायदा होतो. वैज्ञानिक दृष्टिकोनामध्ये संशोधक चमत्कारांचे अवलोकन करतो, निसर्गातील घटनाक्रम तपासतो आणि सर्वसामान्य निर्णयापर्यंत पोचतो. तसेच परिणामांचा अंदाज घेऊन या सर्व प्रक्रियेतून एक नियम तयार करतो. यामध्ये निरीक्षण व तर्कशुद्ध अनुमानाद्वारे सत्य शोधून काढतो. प्रयोग आणि पुनरावृत्ती हे विज्ञानाचे अविभाज्य भाग आहेत. तसेच कोणत्याही गोष्टीचा विज्ञानात समावेश करण्यापूर्वी निसर्गातील प्रत्येक गोष्ट प्रयोगाच्या कसोटीवर तपासून घ्यावी लागते. वैज्ञानिक कार्यकारणभावामार्फत विज्ञानाचा शोध घेतला जातो, हे जरी खरी असले, तरी विज्ञानाची सर्व उत्तरे ही तात्पुरत्या स्वरूपाची असतात. कारण नवे अनुभव, नवी माहिती जशी उपलब्ध होते, त्या प्रमाणात विज्ञानाचे स्वरूपही बदलते. थोडक्यात, हे सत्य जाणून घेण्याची पद्धती आणि दृष्टी म्हणजे वैज्ञानिक दृष्टिकोन होय. 'विज्ञानाची प्रस्तावना' या पुस्तकात टी. ए. थॉमसन विज्ञानाच्या उद्देशाबाबत असे म्हणतात, की "शक्य तितक्या बिनचूक, सोप्या रीतीने व शक्य तितक्या पूर्ण कसोटी लावून निःपक्षपातीपणे अनुभव वर्णन करणे हा विज्ञानाचा उद्देश असतो."

**धर्मप्रामाण्यवाद आणि समाजपरिवर्तनातील संघर्ष**

धर्मप्रामाण्यवाद, रूढी, परंपरांमध्ये प्राचीन काळापासून तीव्र संघर्ष सुरू आहे. त्याचे महत्त्वाचे कारण

म्हणजे धर्माचे हितसंबंध संस्कृतिरक्षणाबरोबर आर्थिक हितसंबंधांत अधिक गुंतलेले आहेत. या अनुषंगाने चार्वाकाने असे म्हटले आहे, की "पौराणिक ग्रंथांत लिहिलेल्या गोष्टींचा फायदा ज्यांना हात किंवा डोके नाही अशा लोकांना स्वतःचा चरितार्थ चालविण्यासाठी होत असतो.' यावरून असे स्पष्ट होते, की धर्मग्रंथांतील दंतकथा, संस्कृतीच्या उदात्तीकरणाद्वारे संस्कृतिसंघर्षाच्या भूमिकेबरोबर आर्थिक हितसंबंधांचा सहभाग महत्त्वाचा ठरतो. समाजपरिवर्तनासाठी विज्ञान-तंत्रज्ञान उपयुक्त ठरते. परंतु त्या प्रमाणात वैज्ञानिक दृष्टीचा प्रचार आणि प्रसार झाला नाही. मात्र विज्ञान-तंत्रज्ञानाने अफाट प्रगती केली यासंबंधी ब्रिटिश सरकारचे तत्कालीन विज्ञान-तंत्रज्ञान सल्लागार लॉर्ड टाड असे म्हणतात, की "गेल्या शंभर वर्षांत मानवी संस्कृतीच्या आधिभौतिकतेमध्ये जेवढा बदल झाला, तेवढा सबंध मानवी इतिहासात कधी आढळला नव्हता आणि या बदलाचे सारे श्रेय आधुनिक विज्ञान-तंत्रज्ञानाला आहे."

**सिद्धान्त आणि व्यवहारात फरक :**

विज्ञान व तंत्रज्ञानाने समाजात क्रांतिकारक बदल केले हे वास्तव असले, तरी त्याची दुसरी बाजू भ्रमनिरास करणारी आहे, कारण सिद्धान्त आणि व्यवहारात नेहमी फरक केला जातो. विज्ञान-तंत्रज्ञानाद्वारे मानवाने चंद्रावर पाऊल ठेवले, मंगळावर मनुष्यवस्तीसाठी प्रयत्न सुरू आहेत; परंतु व्यवहारात आपण अद्यापही ग्रहणाच्या दोन उपपत्ती लावतो. त्यांपैकी पहिली आपण शाळेत शिकवितो ती वैज्ञानिक पद्धती आणि दुसरी घरात अवलंब केला जातो ती. दुसया उपपत्तीप्रमाणे राहू व केतूच्या कचाट्यातून अद्याप चंद्र व सूर्याची सुटका झालेली नाही. वर्गात डार्विनच्या उत्क्रांतिवादाचे शास्त्रीय पद्धतीने अध्यापन केले जाते. परंतु प्रत्यक्ष व्यवहारी जीवनात अशास्त्रीय पद्धतींवर विश्वास ठेवला जातो. पदार्थविज्ञानाच्या सिद्धान्तानुसार वस्तू निर्माण आणि नष्टही करता येत नाही, ही वस्तुस्थिती असली, तरी हवेतून घड्याळ, चेन काढणे अशा चमत्कारिक गोष्टीवर आपण विश्वास ठेवतो. फलज्योतिषासारख्या अशास्त्रीय गोष्टीवर विश्वास ठेवणाया लोकांसाठी विज्ञान पोट भरण्याचे साधन असते. परंतु जीवनाचा तो मार्ग नसतो. धार्मिक अंधश्रद्धा आणि रूढी-परंपरांतून विज्ञान आणि वैज्ञानिक दृष्टिकोनाला प्रचंड् विरोध केला जातो. धर्मगुरू, संत, महंत, महाराजांच्या धार्मिक प्रवचनांतून समाजाची मती गुंग केली जाते. धर्मामुळे विचाराला बंदिस्त केले जाते. म्हणून तर कार्ल मार्क्सने धर्म ही अफूची गोळी, असे म्हटले आहे. धर्मशास्त्राचा अवगुण म्हणजे निसर्गातील घटना, त्याच्या कार्यकारण संबंधाला जुमानत नाही. श्रद्धेची बैठक असलेल्या धर्माच्या वृत्तीबाबत रॉबर्ट जी. इंगरसॉल असे म्हणतात, की "बुद्धी वापरू नका, जपमाळेचे मणी मोजा, फक्त प्रश्न विचारू नका, गुडघे टेका, डोळे बंद करा, असे धर्म सांगतो." यावरून असे स्पष्ट होते, की धर्मशास्त्र हे विज्ञान-तंत्रज्ञानातील मोठा अडसर आहे, यामध्ये दुमत असण्याचे कारण नाही.

सर्व धर्मांचा केंद्रबिंदू ईश्वर असून दंतकथा म्हणजे वस्तुस्थितीचे आदर्शीकरण आहे; तर चमत्कार म्हणजे वस्तुस्थितीचे खोटे दर्शन आणि निसर्गनियमांचा भंग आहे. परंतु या सर्वांचे वैज्ञानिक पद्धतीने कधीही संशोधन झाले नाही. जगातील कोणत्याही धर्मग्रंथातून भौतिक विश्वाचे स्वरूप, त्याचे कार्य की जे पुढे वैज्ञानिक संशोधनाने शोधून काढण्यात आले व सत्य असल्याचे आढळले, असे कोणत्याही धर्मग्रंथात सांगितलेले नाही आणि जेव्हा धर्माने सत्य सांगण्याचा प्रयत्न केला, तेव्हा मोठ्या चुका करण्यात आल्या. त्यांपैकी एक चूक म्हणजे "देवाने ख्रिस्तपूर्व ४००४ साली मानव निर्माण केला किंवा २०१२ मधील ब्रह्मांडाची निर्मिती महाविस्फोटाच्या म्हणजे बिग बँगच्या घटनेनंतर सापडलेल्या कणास गॉड पार्टिकल नाव देण्यात आले, ही शेवटी वैज्ञानिक विश्वाची शोकांतिकाच म्हणावी लागेल. धर्मशास्त्र हे चिकित्सेच्या विरोधी आहे. विचार, कार्यकारणभाव याला धर्मशास्त्रा-कडून विरोध केला जातो." धर्मशास्त्र असे म्हणते, की "विश्वास ठेवा, नाही तर नरकात जा." मात्र वैज्ञानिक वृत्तीचा माणूस विश्वास ठेवण्यापूर्वी प्रथम पुरावा मागतो. आणि कोणत्याही घटनेवर दुसयाला विश्वास ठेवण्यास सांगताना पुरावा देतो. परंतु धर्मशास्त्रामुळे व्यक्तीच्या विचाराचा मार्ग बंद केला जातो. धर्माच्या वर्चस्वामुळे समाज डोळे उघडे ठेवून घटनांकडे पाहत नाही; घटनेचा कार्यकारणसंबंध आणि चिकित्सा केली जात नाही. या

अनुषंगाने थॉमस पाईन असे म्हणतात, की "विचार करण्याचे ज्याने सोडून दिले आहे, त्यांच्याशी चर्चा करणे म्हणजे मृताला औषधोपचार करण्यासारखे आहे." [२] धर्मशास्त्र आणि विज्ञान-तंत्रज्ञानामध्ये सातत्याने द्वंद्व सुरू आहे. देवावरील श्रद्धा अद्यापही कमी झालेली नाही; आणि दुसऱ्या बाजूला विज्ञान-तंत्रज्ञानही आपली बाजू भक्कम उभी करीत असते. हे पुढील घटनांवरून स्पष्ट होते– चंद्रावर पाऊल ठेवलेल्या अमेरिकन चांद्रवीराने थँक्स गॉड! गॉड इज ग्रेट! असे उद्गार काढले आणि रशियन चांद्रवीर चंद्रावर पाऊल ठेवताना म्हणाला, 'माझे चंद्रावरचे पाऊल हा मानवी प्रज्ञेने निसर्गावर मिळविलेला विजय आहे.' [३] यामध्ये रशियन चांद्रवीराचे उत्तर अधिक वैज्ञानिक वृत्तीचे आहे, यामध्ये दुमत असण्याचे कारण नाही.

**ईश्वरी कल्पना आणि मानवतावाद :**

ईश्वराच्या गूढवादी कल्पनेमुळे मानवतावादाकडे दुर्लक्ष करण्यात आले. वास्तविक मानवतावाद धार्मिक तत्त्वज्ञान आहे, की नीतिसंहिता आहे, याबाबत मोठा गोंधळ दिसून येतो. कारण मानवतावादी हे वैज्ञानिक, धार्मिक, सौंदर्यवादी, विचारवादी, अज्ञेयवादी व नैतिकवादी विचारांचेही असू शकतात. तसेच राहिलेल्या अवकाशात उदारमतवादी, मार्क्सवादी, निसर्गवादी सर्वजण स्वतःला मानवतावादी मानतात. तरीसुद्धा आपण विज्ञानाशी सुसंगत मानवतावादी विचार स्वीकारणे हिताचे असून तो पारंपरिक आणि धार्मिक विचारांपेक्षा वेगळा विचार असला पाहिजे. मानवतावादामध्ये मानवाचा विकास, त्याची सहनशीलता, समाधान, कायद्याचे राज्य, स्वातंत्र्य, न्याय, समतेला प्राधान्यक्रम दिला पाहिजे. 'जगा आणि जगू द्या' हा मानवतावादाचा पाया असला पाहिजे; कोणत्याही दैवी शक्तीचा आधार अथवा कुबड्या न घेता स्वतःच्या पायावर स्वतंत्रपणे उभे राहिले पाहिजे. कोणत्याही बाह्य शक्तीने मानवाचा विकास होत नाही, याची जाणीव ठेवून तथागत गौतम बुद्धांच्या 'अत्तः दीपो भव।' चा स्वीकार हाच जीवनाचा सर्वोत्कृष्ट प्रेरणादायी मार्ग आहे. फ्रेंच विचारवंत व्हॉल्टेअर मानवताबाबत असे म्हणतात, की "माणसाने प्रथम ईश्वर निर्माण केला आणि नंतर ईश्वराने माणूस निर्माण केला, या कल्पनेवर माणसाने विश्वास ठेवला." परंतु विज्ञानानुसार असे कोणीही काही निर्माण केलेले नाही. सर्व उत्क्रांतीतून निर्माण झाले आहे. माणसाने माणसांवर आणि त्याच्यातील शक्तीवर विश्वास ठेवावा. मानवतावादात दैव, भविष्य, नशीब यांना स्थान नसून प्रत्येक व्यक्तीच्या स्वातंत्र्य आणि प्रतिष्ठेला महत्त्व आहे. जन्म, मृत्यू जैविक विज्ञान आहे. ईश्वरी चमत्काराशी त्याचा काहीएक संबंध नाही.

**भारतातील वैज्ञानिक दृष्टिकोनाची पायाभरणी :**

भारतात तथागत गौतम बुद्धांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा, विवेकाचा पाया घातला. आधुनिक काळात पाश्चात्त्य शिक्षणाने देशात वैचारिक आणि धार्मिक सुधारणा-चळवळीने जोर धरला होता. राजा राममोहन रॉय, दयानंद सरस्वती, स्वामी विवेकानंद, गोपाळ गणेश आगरकर, महर्षी धोंडो केशव कर्वे आदी समाजसुधारकांनी हिंदू धर्मातील अनिष्ट चालीरीती, रूढी, परंपरांविरुद्ध बंड केले, हे जरी वास्तव असले, तरी हिंदुत्ववादाला त्यांनी सोडले नाही. मात्र महात्मा ज्योतीबा फुले यांनी सत्यशोधक चळवळीचा अंगीकार करून बुद्धपरंपरा पुढे नेली. राज्याच्या ईश्वरनिर्मित सिद्धान्ताला कडवा विरोध करून निर्मिकाचा सिद्धान्त खोटा ठरविला. यावरून असे स्पष्ट होते, की शंभर वर्षांपूर्वी महाराष्ट्राच्या सत्यशोधक चळवळीने जेवढा वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार केला होता, त्याच्या निम्मा विचार स्वीकारला असता, तर महाराष्ट्राच्या सामाजिक परिवर्तनात मोठी क्रांती झाली असती. आधुनिक युगातील ताण-तणावांतून मुक्त होण्यासाठी पुन्हा एकदा लोक धर्माकडे वळत आहेत. हे सर्व आधुनिक तत्त्वज्ञानाच्या विरोधात आहे. हेगलने विवेक हा श्रद्धेपेक्षा श्रेष्ठ मानला. फ्रॉईड भ्रमाला भविष्य नाही म्हणतो. नीत्से परमेश्वराचा अंत झाला असे म्हणतो. विवेकवादाच्या विचारावर पुढे गेलेला समाज पुन्हा एकदा धर्मातील अज्ञान, रूढी, परंपरांकडे वळत आहे.

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर : माझा देवावर विश्वास नाही.**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी तथागत बुद्धपरंपरेचा जाणीवपूर्वक स्वीकार केला होता. ते खरे विवेकनिष्ठ होते. सोमवंशीय हितकारी समाज आणि तायवाडी येथील

अस्पृश्यांच्या विद्यमाने डॉ. बाबासाहेब आंबेडकर व डॉ. सोळंकी यांना मानपत्रे व थैली देण्याचा कार्यक्रम दिनांक १९ मार्च १९३८ रोजी पार पडला, त्यामध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले, 'माझा देवावर विश्वास नाही.' [४]

**स्वातंत्र्यानंतर देशातील वैज्ञानिक मनोवृत्तीत वाढीचा प्रयत्न :**

ब्रिटिशांच्या इंग्रजी शिक्षणाच्या प्रचार आणि प्रसारामुळे भारतात वैज्ञानिकांची एक मोठी फळी निर्माण झाली. जगदीशचंद्र बोस, प्रफुल्लचंद्र रे, सी. व्ही. रामन, मेघनाथ साहा, एस. एन. बोस, एम. विश्वेश्वरैय्या, एन. रामानुजम्, यांच्या संशोधनातून भारतीय विज्ञानाची पायाभरणी झाली. भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांनी विज्ञान आणि वैज्ञानिक दृष्टिकोनवाढीसाठी मोठे प्रोत्साहन आणि चालना दिली. विज्ञानाबाबत पंडित नेहरू असे म्हणतात, की "विज्ञान म्हणजे निव्वळ नळकांड्यांत रसायनांचे मिश्रण करून किंवा लहानमोठी वस्तू करणे नव्हे. विज्ञान म्हणजे मनाला एक प्रकारची शिस्त लावून शास्त्रीय पद्धतीने जीवन जगण्याचा एक वेगळा मार्ग आहे." वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार केल्याशिवाय सामर्थ्यवान भारताची निर्मिती होणार नाही या अनुषंगाने ते पुढे असे म्हणतात, की "आपले भवितव्य आपण ठरवू शकेल, असा सामर्थ्यवान भारत घडविताना आपल्यापुढे अनेक समस्या आहेत. दारिद्र्य, उपासमार, रोगराई, निवारा, प्रचंड लोकसंख्या आणि तुटपुंज्या सोयी, दरवर्षी येणारे महापूर व नेहमी कुठे ना कुठे पडणारा दुष्काळ, एक ना दोन. त्यांच्या भरीस आपल्या पाचवीला पुजलेले विविध धर्म, पंथ, जाती यांच्यामधील तंटे-बखेडे! या सर्व समस्यांवर उपाय तरी कोणता? कधी सुटणार या समस्या?' ते पुढे असेही म्हणतात, "या सर्व समस्यांचे निराकरण करण्यासाठी निरीक्षण, अचूक ज्ञान आणि बुद्धिनिष्ठ विचारसरणी यांचा अवलंब करणे आवश्यक आहे. सत्य व वस्तुस्थिती जाणून घेण्यासाठी उत्स्फूर्त व उपजत ज्ञानाचा उपयोग होतो. या गोष्टींचा आपणांस विसर पडता कामा नये. असे असले तरीसुद्धा योग्य दिशेने वाटचाल करण्यासाठी बुद्धीच्या कसोटीवर पारखून घेतलेल्या अचूक ज्ञानाचा मार्गच आपल्याला पत्करला पाहिजे." [५] बुद्धिप्रामाण्य आणि विज्ञानासंबंधी पंडित जवाहरलाल नेहरू 'भारताचा शोध' या ग्रंथात असे म्हणतात, की "बुद्धिप्रामाण्याच्या व विज्ञान-शास्त्राच्या मर्यादा ध्यानात ठेवून, आपण आटोकाट प्रयत्न करून त्यांचाच आधार घेत राहिले पाहिजे. ते सोडून आपले चालणार नाही. कारण ह्या जोडीच्या पार्श्वभूमीवाचून व तिचा भक्कम आधार घेतल्याशिवाय सत्य व शाश्वताच्या कोणत्याच भागावर आपली कसलीही पकड राहणे शक्य नाही." [६] तसेच १९५३ साली पंडित जवाहरलाल नेहरूंनी वैज्ञानिक धोरणावर आपले उद्बोधक विचार व्यक्त करताना असे म्हटले, की "Scientific temperament is a process of thinking, method of action, search of truth, way of life, spirit of free man". वरील संबंधाचे डॉ. नरेंद्र दाभोलकर असे स्पष्टीकरण करतात– Scientific temperament म्हणजे वैज्ञानिक दृष्टिकोन. is a process of thinking म्हणजे तो विचार करण्याचा मार्ग आहे. पण तो तेवढाच आहे का? नाही. तो Method of action कृती करण्याचाही मार्ग आहे. तो तेवढाच आहे का? नाही. It is search of Truth, ती सत्यशोधनाची प्रक्रिया आहे. पण ती तेवढीच आहे का? नाही. It is a way of Life, ती जीवनधारणा आहे. परंतु ती तेवढीच आहे का? It is spirit of free man म्हणजे माणसाला सर्वात मौल्यवान असलेल्या स्वातंत्र्याचे वैज्ञानिक दृष्टिकोन हे आत्मतत्व आहे." [७] वैज्ञानिक दृष्टिकोनामुळे समाजविकास आणि समाजपरिवर्तनास मोठी चालना मिळू शकते. या अनुषंगाने ४ मार्च १९५८ च्या भाषणात पंडित जवाहरलाल नेहरू असे म्हणतात, की "वैज्ञानिक पद्धती व मार्ग स्वीकारले आणि वैज्ञानिक ज्ञानाचा उपयोग केला, तरच समाजातील प्रत्येक घटकाला सर्व सुविधा आणि सुखसोयी मिळू शकतील. विज्ञानाने विलक्षण सांस्कृतिक प्रगती तर घडवून आणलीच आहे; पण त्यापलीकडे अशक्यप्राय गोष्टीही शक्य करून दाखविल्या आहेत. त्यामुळे विचाराच्या नव्या दिशा उपलब्ध झाल्या आहेत आणि क्षितिजे रुंदावली आहेत. जीवनाच्या मूलभूत मूल्यांवरही त्यामुळे परिणाम झाला आहे. तसेच सांस्कृतिक उभारणीलासुद्धा नवा उन्मेष लाभला आहे."

**वैज्ञानिक दृष्टिकोन आणि संविधान दुरुस्ती :**

भारतीय संविधान हा सामाजिक आणि आर्थिक न्यायाचा दस्तऐवज आहे. भारतात धर्म, रूढी, परंपरा, जातिव्यवस्था, अंधश्रद्धा, अज्ञान आणि निरक्षरतेमुळे कोणत्याही घटनेकडे विवेकाने पाहण्याचा वैज्ञानिक दृष्टिकोन नव्हता. समाजात वैज्ञानिक दृष्टिकोन वृद्धिंगत करण्यामध्ये पंडित जवाहरलाल नेहरू यांचा मोलाचा वाटा आहे. परंतु पंडित नेहरूंच्या नंतर, त्यांच्या कन्या पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी १९७६ साली ४२वी संविधान दुरुस्ती करून वैज्ञानिक दृष्टिकोनाला संविधानात्मक दर्जा प्राप्त करून दिला. प्रकरण चार-मधील राज्याच्या धोरणाच्या मार्गदर्शक तत्त्वांमध्ये कलम ५१ क मध्ये दहा मूलभूत कर्तव्यांचा समावेश करण्यात आला. यांत "प्रत्येक भारतीय नागरिकाचे कर्तव्य आहे, की विज्ञाननिष्ठ दृष्टिकोन, मानवतावाद आणि शोधकबुद्धी व सुधारणावाद यांचा विकास करणे", [८] अशी एक तरतूद आहे. नवे शैक्षणिक धोरण १९८५ आणि वैज्ञानिक दृष्टिकोनाचा राष्ट्रीय विकासामध्ये महत्त्वाचा संबंध जोडला जातो. माजी पंतप्रधान राजीव गांधी यांनी १९८५ च्या नव्या शैक्षणिक धोरणात 'वैज्ञानिक मनोभावाची निर्मिती' या गाभाघटकास स्थान दिले आहे. त्याचा मुख्य उद्देश विद्यार्थ्यांच्या कोवळ्या वयामध्येच वैज्ञानिक दृष्टी वाढावी असा आहे. यावरून असे स्पष्ट होते, की भारतात सामाजिक, आर्थिक न्याय प्रस्थापित करण्यासाठी आणि महान राष्ट्रनिर्मितीसाठी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वाटा महत्त्वांचा असतो. यासाठी सर्व भारतीयांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाचा स्वीकार केला तर निश्चितच भारत महान राष्ट्र होऊ शकते, यामध्ये कोणतीही शंका असण्याचे कारण नाही.

**निष्कर्ष :**

१. वैज्ञानिक दृष्टिकोनामुळे मानवाला जीवनक्रम बदलणे आणि चांगल्या गोष्टींची निवड करणे शक्य होते.

२. प्राथमिक शिक्षणापासून, उच्च शिक्षणापर्यंत सर्वच क्षेत्रांत वैज्ञानिक दृष्टिकोन वाढविण्याचा प्रयत्न करणे गरजेचे आहे.

३. मुद्रित व दृक्‌श्राव्य माध्यमांनी वैज्ञानिक दृष्टिकोनाच्या वाढीसाठी प्रयत्न करावा. अंधश्रद्धांना खतपाणी घालू नये.

**संदर्भ सूची :**


(१) एच. नरसिंहैया, वैज्ञानिक मनोवृत्ती आणि मानवतावाद कशासाठी? भारत सरकार प्रकाशन : योजना १९८३, पृ. १०.

(२) उपरोक्त, पृ. १०.

(३) दाभोलकर नरेंद्र, आर्डे प. रा., अंधश्रद्धा : प्रश्नचिन्ह आणि पूर्णविराम, राजहंस प्रकाशन, डिसेंबर २००६.

(४) गांजरे मा. फ.; डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे, खंड ३, पृ. १५ (मूळ जनता दिन, ९ एप्रिल १९३८).

(५) नेहरू, पंडित जवाहरलाल; भारताचा शोध (मराठी अनुवाद), साने गुरूजी, ना. वि. करंदीकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.

(६) उपरोक्त, पृ. ६१४.

(७) दाभोलकर नरेंद्र, श्रद्धा आणि अंधश्रद्धा, राजहंस प्रकाशन पुणे, ३०, पृ. ४०, नववी आवृत्ती, मार्च २०१०.

(८) भारतसरकार विधि व न्याय मंत्रालय, भारताचे संविधान, भाग चार, ५१ क. पृ. २०, आवृत्ती २००६.


***

# इंग्लिश सेमी, शिक्षण कमी

रमेश पानसे

काय गंमत आहे बघा. तिकडे कर्नाटकात, सरकार मातृभाषेतून प्राथमिक शिक्षण सक्तीने करण्याचा घाट घालते आहे; सर्वोच्च न्यायालय मातृभाषा आणि प्राथमिक शिक्षण यांचा घनिष्ठ संबंध वेगवेगळ्या अंगांनी तपासण्याचा विचार मांडत आहे. ज्या शिक्षणहक्क कायद्याची सदोदित टिमकी वाजवून महाराष्ट्र शासन अनेक भली-बुरी पत्रके सपाट्याने काढत आहे, त्या कायद्याच्या २९ व्या कलमात 'शक्यतो शिकण्याचे माध्यम बालकाची मातृभाषा हेच असावे', असे म्हटले आहे, तरीही महाराष्ट्रात इंग्रजी शाळांची नि इंग्रजी भाषेची चलती कशी होईल, हेच शासनाच्या सर्व स्तरांवरून पाहिले जात आहे. जेथे पुरते इंग्रजी आणता येत नाही तेथे, अनेक जिल्ह्यांमधील आणि नगरपरिषदा, महानगरपालिकांमधील शिक्षणाच्या अधिकारावरील कर्मचारी, 'सेमी इंग्रजी' आणण्याचा प्रयत्न वारा प्यायल्याप्रमाणे करीत आहेत.

वास्तविक जे देशाची घटना पाळू इच्छिताता, जे नवीन बालकाच्या शिक्षणाच्या हक्काच्या कायद्याचा आदर ठेवू इच्छितात, त्या साऱ्यांनी 'मातृभाषेतून शिक्षण' याचा कसोशीने प्रयत्न करायला हवा. शिक्षणहक्क कायद्याची नीटसपणे अंमलबजावणी करण्याची सक्ती सरकारवर आहे. त्यामुळे मातृभाषेतून शिक्षण ही कायद्यातील आदेशवजा सूचना विचारात घेऊन, शासकीय पातळीवरून जोरदार प्रयत्न व्हायला हवे आहेत. शासनाने चांगले, मुलांच्या हिताचे निर्णय घेतले, तर समाज त्यांच्यामागे उभा राहील. परंतु हे न करता, शासनाची गंगा उलट दिशेने वाहत आहे. वरपासून खालपर्यंत शासकीय शिक्षणकर्मचाऱ्यांमध्ये इंग्रजीलाच कवटाळून धरण्याची वृत्ती दिसते आहे. ही वृत्ती इंग्रजीच्या वृथा मोठेपणामुळे किंवा त्यांच्या न्यूनगंडातून आली असावी.

'सेमी इंग्रजी'चे हे खूळ कशामुळे फोफावले? सरकारने जेव्हा वाकडी वाट करून इंग्रजीवर प्रीती करायला सुरुवात केली, तेव्हा खाजगी इंग्रजी शाळा वाढू लागल्या; त्यातच लोकांना आकर्षित करतील अशा CBSC, ICSC, IB अशा नावांच्या आणि परकीय मुळे असलेल्या इंग्रजी शाळांची चलती होऊ लागली. याच काळात जागतिकीकरण, खुली अर्थव्यवस्था यांचे आर्थिक परिणाम होऊन, मध्यमवर्गीय समाज 'उच्च' मध्यमवर्गीय होऊ लागला. त्यातच पुन्हा माहिती-तंत्रज्ञानाने उचल खाल्ली व ज्यावर इंग्रजी भाषाच केवळ उपलब्ध आहे, अशा संगणकाने इंग्रजीला वाढते महत्त्व दिले; त्याचबरोबर ह्या क्षेत्रात नोकऱ्या व पगारमान वाढले. परिणामतः 'उच्च' मध्यमवर्ग अधिक 'उच्च' झाला. या क्षेत्रातील मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळांकडे वळू लागली. समाजात नेहमीच एक 'प्रदर्शन-परिणाम' घडून येत असतो. वरच्या वर्गाने जे केले ते, तुलनेने खाली असलेला आर्थिक वर्ग करू लागतो. मग तो लग्नाचा खर्च असो वा रस्त्यांवर स्वतःच्या छबीचे फ्लेक्स लावणे असो. असा प्रदर्शन-परिणाम हा नेहमीच विचारापेक्षा अविचारावर आणि उपयुक्ततेपेक्षा प्रतिष्ठिततेवर बेतलेला असतो. असाच वाढता प्रदर्शन-परिणाम होऊन सर्वच समाजगटांची मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळांकडे वळू लागली. शालेय शिक्षणात मागणीनुसार पुरवठा करणारी इंग्रजी शाळांची मांदियाळी वाढत गेली आणि अखेरीस त्यातून मूल्यांपेक्षा धंद्याला आणि शिक्षणापेक्षा माध्यमाला महत्त्व प्राप्त होऊ लागले.

इंग्रजी शाळांकडे जेव्हा समाजाचा ओघ वाढू लागला तेव्हा, साहजिकच, त्याचा परिणाम मराठी शाळांच्या उपस्थितीवर होऊ लागला. मराठी शाळांची व्यवस्थापने चिंतित झाली. यात खाजगी शाळांपेक्षाही सरकारी शाळांची परिस्थिती अधिकच बिकट होऊ लागली. मुळातच घसरत्या दर्जामुळे लोकांचा ओढा सरकारी शाळांऐवजी खाजगी मराठी शाळांकडे वळू लागला होता. त्यातच इंग्रजी माध्यमाच्या शाळांनीही आघात करायला सुरुवात केली. अशा वेळी ह्या सरकारी मराठी शाळांना जगण्यासाठी नि तगण्यासाठी काहीतरी इंग्रजीचे गंध लावून

अनुक्रमणिका

घेण्याची गरज निर्माण झाली.

आणि महाराष्ट्र शासनाने पहिला दणकट प्रयोग केला तो सर्व मराठी शाळांमधून पहिलीपासून इंग्रजी शिकविण्यास सुरुवात करण्याचा. मुलांना सफाईदार इंग्रजी यावे म्हणून नव्हे, तर मुले सरकारी मराठी शाळांना चिकटून राहावीत असाच सुप्त हेतू ह्या प्रयोगाचा होता. पण हा बार फुसका निघाला. आता ह्या प्रयोगाला एक तप उलटून गेले. विद्यार्थ्यांच्या पलटणी दहावी उत्तीर्ण होत गेल्या; पण दहा वर्षे इंग्रजी विषय शिकूनही त्यांना म्हणावे तसे इंग्रजी आलेच नाही. कोट्यवधी रुपये खर्च झाले, हजारो प्रशिक्षणे झाली. ह्या प्रयोगावर पाण्यासारखा ओतलेला पैसा पाण्यासारखा वाहून गेला. मुले, शालान्त परीक्षेच्या मांडवाखालून जाताना फाड-फाड इंग्रजी बोलत बाहेर पडतील, हे स्वप्न काही साकार झाले नाही.

आता सरकारला वाटले, शालेय शिक्षणात इंग्रजीचा अंश कमी पडतोय; मग पालकांना फसविण्यासाठी, सेमी-इंग्रजीचे खूळ, प्रथमतः प्रायोगिक स्तरावर सुरू झाले आणि आता तर त्याची कोणतीच शहानिशा न करता व्यापक स्तरावर सेमी-इंग्रजीचे वर्ग वाढविण्याचा घाट घातला गेला आहे. ज्ञानाच्या क्षेत्रात अज्ञानाला भरती आली आणि सेमी-इंग्रजीचे हे काँग्रेसगवत पाहता पाहता पसरू लागले.

गणित व विज्ञान हे विषय इंग्रजीतून ठेवण्यात एक व्यावहारिकता नि एक मानसिकता दडलेली आहे. पूर्वीपासूनच आपल्या शालेय शिक्षणात गणित व विज्ञान या दोन विषयांना उगीचच महत्त्व प्राप्त झाले आहे. कदाचित शालेय पातळीवर हे विषय मुलांना कठीण जातात, अधिक मुले याच विषयांत नापास होतात, त्यामुळे त्यांची मुलांना भीती वाटते, म्हणून या विषयांचे महत्त्व वाढत गेले असावे. इंग्रजीचीही मुलांच्या मनांत अशीच भीती असते. या विषयांना आणखी एका व्यावहारिक कारणाने महत्त्व आलेले आहे. व्यावहारिक मुद्दा असा की, कदाचित या विषयांच्या विद्यापीठीय शिक्षणानंतर आरोग्य-अभियांत्रिकी हे अधिक पैसे मिळवून देणारे जीवनमार्ग (करियर) स्वीकारता येतात, म्हणून लोकांच्या मनांतून ह्या विषयांचे महत्त्व द्विगुणित झालेले असावे. अजूनही हुशार मुले विज्ञानाकडे वळतात असेच नव्हे, तर विज्ञानाकडे वळतात त्यांना (उगीचच) हुशार म्हणून प्रतिष्ठा प्राप्त होते. अशा मुलांचा अहंगंड सुखावत असतो. आज बदलत्या जगात ह्या विषयांचे स्वतंत्र असे महत्त्व राहिलेले नाही. पण लोक परंपरा धरून ठेवतात.

गणित व विज्ञान हे विषय मराठी शाळांमधूनही इंग्रजीतून शिकविले जावेत, याचे आणखी एका प्रकारे समर्थन केले जाते. ज्या शाळांतून सेमी-इंग्रजीचे वर्ग आहेत अशा शाळांचे व्यवस्थापक, बऱ्याचदा असे सांगतात, की मराठीतून शिकणाऱ्या मुलांना अकरावी-बारावीत गेल्यावर गणित व विज्ञान हे विषय इंग्रजीतून कठीण जातात. म्हणून ते पाचवीपासूनच (आणि आता तर पहिलीपासूनच) इंग्रजीतून शिकविले गेले, तर ते त्यांना पुढे सोपे जातील. अनेक पालकही आता ह्याच मतात वाहून गेलेले दिसतात.

ह्या मुद्द्याचा प्रतिवाद अगदी शास्त्रीयतेने करणे सहज शक्य आहे.

पहिली गोष्ट अशी, की अकरावी-बारावीला हेच काय पण विज्ञानशाखेचे सर्वच विषय मराठीमधून शिकण्याची तदतूद आहे. शिकणे महत्त्वाचे, माध्यम दुय्यम असते हे जाणवून अनेक विद्यार्थी वाढत्या संख्येने ह्या पर्यायाकडे वळत आहेत. आपल्या पहिल्या भाषेतून शिकणे हे नैसर्गिक रीत्या सहज व सोपे असते, हे लक्षात घेऊन अनेक विद्यार्थी ह्या पर्यायाकडे वळताहेत. विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक विकासाच्या दृष्टीने हे एक सुचिन्ह आहे. तरीही हे जे घडते आहे, ते फारच अल्प प्रमाणात आहे. अजूनही बहुसंख्य पालकांना सेमी-इंग्रजीचे आकर्षण आहे. त्यांना हे कळायला हवे की, जे विषय अकरावी-बारावीला इंग्रजीतून कठीण जाऊन त्यांचा ताण मुलांवर पडतो, तर हा ताण पहिली–दुसरीतल्या मुलांना तर सहन करण्यापलीकडे असणार नाही का? आपण असे मानू या, की शालेय शिक्षणात पहिलीपासून इंग्रजी हा एक विषय शिकवायला सुरुवात केल्यापासून अकरावीला जाईपर्यंत मुलांना काहीतरी इंग्रजी येऊ लागलेले असेल. वाचण्या–लिहिण्याच्या इंग्रजीचा काही प्रमाणात तरी सराव झालेला असेल. पण पहिलीतल्या मुलांची किती दयनीय अवस्था असेल? त्याला अजिबात इंग्रजी येत नसताना,

आपल्याला न येणाया भाषेतून त्याला आपण मानसिक पातळीवर, मुळातच ज्यांचे दडपण आहे असे गणित–-विज्ञान शिकायला लावणार, यात मुलांवर आपण अन्याय करत नाही का?

आणखी एक असे, की विज्ञान व गणित हे विषय या सेमी-इंग्रजी प्रकरणात इंग्रजीतून शिकविण्यासाठी कोणी व का निवडले? सेमी-इंग्रजीवाल्या मुलांना अखेरीस इंग्लिश यावे असा जर सुप्त हेतू सेमी-इंग्लिशचा आग्रह धरणायांचा असेल, तर गणित व विज्ञान हे दोन विषय फारसे उपयुक्त नाहीत; त्यापेक्षा इतिहास, भूगोल असे वर्णनात्मक आशय असणारे विषय चांगले ठरतील. मला वाटते, अनेक वर्षे आपण विज्ञान, गणित या विषयांना इतर विषयांच्या तुलनेत अनाठायी महत्त्व देत आलो आहोत. हेच विषय फक्त कठीण असतात, अशीही त्यांची उगीचच भलावण करत आलो आहोत. त्यामुळे एक घातक परिणाम असाही झाला आहे, की ज्या मुलांना हे विषय बयापैकी येतात, त्यांनाच आपण हुशार म्हणून मानू लागलो. अन्य विषय येणाया, आवडणाया विद्यार्थ्यांवर 'कमी प्रती'चा शिक्का मारून त्यांच्यावर अन्याय करीत आलो. आतातर मी असे ऐकतो, की कित्येक शाळांतून, गेली काही वर्षे पाचवीपासून सेमी-इंग्रजीचा पर्याय एका निवडक तुकडीला दिला गेला; साहजिकच विद्यार्थ्यांची निवड करावी लागली आणि सहजपणेच वर्गामधील तथाकथित 'हुशार' मुलांना सेमी-इंग्रजीसाठी निवडले गेले. म्हणजे मुळातूनच विषमता पेरण्याचा प्रकार शाळांमधून चालूच आहे. ही विषमता टोकाला नेण्याचाही प्रकार मला एका शाळेत आढळला. तेथे सेमी-इंग्रजीचे विद्यार्थी वेगळे उठून दिसावे म्हणून त्यांनाच केवळ टाय-बूट घालायला लावून, गुलामीत बुडालेला त्यांचा अहंगंड वाढविण्याचे काम त्या शाळेने केले आहे.

परंतु हे तर काहीच नाही असा एक, बौद्धिक दृष्ट्या मुलांच्या बाबतचा गंभीर गुन्हा हे सेमी-इंग्रजीवाले करीत असतात. तो म्हणजे, तथाकथित हुशार विद्यार्थ्यांना विज्ञान–गणित इंग्रजीतून करायला लावून, त्यांच्यासाठी त्यांनी पुढे दहावीनंतर विज्ञान शाखेकडेच जायचे आहे, अशी आगावूच निवड करून देतात. 'आम्ही हुशार आहोत', 'आम्ही सेमी-इंग्रजी करतो' आणि 'पुढे आम्ही विज्ञान-शाखेकडेच जाणार आहोत' अशी मुलांची मानसिकता तयार करुन, ही मंडळी देतात. आता तर, पहिलीपासूनच हा गुन्हा घडवायला शासकीय अधिकायांसह अनेक संस्थाचालक नि पालक सज्ज झाले आहेत. दहावीनंतर काय शिकायचे याची अगदी पहिलीतच (विद्यार्थ्यांचे मत विचारात न घेता), जवळच्या प्रौढांनी निवड करून देणे, हा या छोट्या मुलांवर अन्याय आहे. वास्तविक दहावीनंतर मुले बयापैकी जाणती होतात. आपला आपण विचार करू शकतात, आपला कल ओळखू शकतात, आपली आवड त्यांना कळू लागते. दुसया बाजूला शिक्षणाचे विविध पर्याय, विविध शाखा त्यांना कळू शकतात. यांबाबतची माहितीही त्यांना पुरवता येते. थोडक्यात असे की, संधी आणि स्वातंत्र्य दिले, तर मुले आपापली निवड करू शकतात. अशी निवड करणे हे, बाह्य जगातील संधी आणि स्वतःच्या अंतर्गत क्षमता ह्यांचा मेळ घालण्याचे काम असते; आणि हे काम मुले पंधरा-सोळाव्या वर्षी सहजपणे करू शकतात. शिवाय त्यांना आवश्यक ती मदत समाज पुरवू शकतो. पहिलीत किंवा पाचवीत मात्र हे शक्य नसते.

एखाद्या विद्याशाखेची निवड करणे, हे एक निर्णय घेण्याचे काम असते. हा निर्णय बौद्धिक पातळीवरचा असतो. बौद्धिक पातळीवरील निर्णय घेता येण्यासाठी एक विवक्षित वय यावे लागते. तसेच, असा बौद्धिक पातळीवरचा निर्णय घेताना, स्वतःचा म्हणजे स्वतःच्या कौशल्यक्षमतेचा व कल–आवड यांचा अंदाज घेता यावा लागतो. पुन्हा, अंदाज घेण्याची क्षमता अंगी येण्यासाठीही एक विवक्षित वय यावे लागते. ही गोष्ट मुलांच्या नैसर्गिक अशा शारीरिक व बौद्धिक वाढीशी संबंधित असते. पालकांना, संस्थाचालकांना अथवा सरकारी शिक्षण–कर्मचायांना काय वाटते, ह्याच्याशी ती संबंधित नाही.

प्रत्येक मुला-मुलीच्या शालेय वयात, त्यांचा शारीरिक विकास, त्यांचा बौद्धिक विकास ह्यांचा त्यांच्या शिक्षणाशी घनिष्ट संबंध आहे. आणि ही दोन्हीही विकासक्षेत्रे मेंदूच्या नैसर्गिक प्रक्रियांशी संबंधित आहेत. साहजिकच मेंदू आणि मुलांचे शिक्षण यांचा बळकट संबंध अलीकडे

बांधला जात आहे. आपण आत्ता ज्याचा विचार करीत आहोत, त्या सेमी-इंग्रजीबाबतच्या, विद्यार्थ्यांच्या निवड व निर्णयक्षमतेचा त्यांच्या वयाशी जो संबंध जोडत आहोत, त्यावर ही विचारप्रारूपे काही प्रकाश पाडू शकतात.

शालेय शिक्षणातील वयाचे दोन गट स्थूलमानाने पाडता येतील. एक आठ वर्षे वयापर्यंतचा आणि दुसरा आठ ते चौदा-पंधरा वयापर्यंतचा गट. आठ वर्षांपर्यंतचे वय हे विलक्षण वेगाने घडून येणाया मेंदूघडणीचे वय असते. विविध मानवी क्षमतांच्या निर्मितीचा आणि त्यासाठी मेंदूमध्ये होत जाणाया बदलांचा हा काळ असतो. मेंदूमध्ये असणाया अब्जावधी पेशींच्या परस्पर-जोडणीचा, अनुभवांच्या आधारावर पेशींच्या मज्जातंतूंवर मायेलीनच्या द्रावणाचा लेप चढण्याचा हा काळ असतो. पेशींचे संदेशवहनाचे, त्याद्वारे नवनवे ज्ञान आत्मसात करण्याचे, सतत शिकण्याचे काम, या द्रावणाच्या लेपाने बळकट होत जाते. सामान्यपणे बहुतेक शारीरिक क्षमतांच्या पायाभरणीचे काम, या द्रावणाच्या लेपाने बळकट होत जाते. सामान्यपणे बहुतेक शारीरिक क्षमतांच्या पायाभरणीचे काम आठ वयापर्यंत पूर्ण होत असते. परंतु बौद्धिक क्रियांच्या बाबतीत पूर्णता यायला आणखी काही वर्षे जावी लागतात. मज्जापेशींवर मायेलिनचा थर चढविण्याचे काम मेंदू एकाच वेळी करीत नाही; हे काम टप्प्याटप्प्याने होत जाते. उदाहरणार्थ, मेंदूमधील प्रेरक आणि संवेदी क्षमतांचा भाग म्हणून ओळखला जाणारा पार्श्विकापालीचा (पेरिएटल लोब) भाग, हे काम वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत पूर्ण करीत नाही, तर भाषा व भावना यांच्याबाबतच्या प्रक्रिया करणारा शंखपालीचा (टेंपोरेल लोब) भाग पूर्णतेला पोचण्यासाठी सोळावे वय यावे लागते. अशाच प्रकारे ललाटपालीचा (फ्रंटल लोब) म्हणजे त्यामधील पेशींच्या अक्षतंतूच्या मायेलिनचे काम पूर्ण होण्यासाठी चौदावे-पंधरावे वय यावे लागते. ललाटपालीचे वैशिष्ट्य असे, की हा भाग अमूर्त विचार, भाषावापर आणि निर्णय-क्षमतेचा वाली आहे. चौदा-पंधरा-सोळा वर्षांचा युवक किंवा युवती स्वतःचे निर्णय घ्यायला, त्यासाठी निवड करायला, त्यासाठी अंदाज घ्यायला, समोर उपलब्ध असलेल्या पर्यायांची तुलना करायला सक्षम झालेले असतात. मात्र या वयातील मेंदूचे मायेलिनच थर चढविण्याचे कार्य प्रामुख्याने अवलंबून असते ते वयाबरोबर प्राप्त होणाया कृतिशील अनुभवांच्या संख्येवर, दर्जावर आणि त्यासाठी उपलब्ध वातावरणाच्या श्रीमंतीवर. साहजिकच ह्याच वयात अशी कामे त्यांना करता येतात आणि पेलतातही. परंतु हेच काम जर कुणी त्यांच्या माथी वयाच्या सहाव्या-सातव्या वर्षी किंवा दहाव्या-अकराव्या वर्षी मारले, तर मात्र त्यांची अक्षमताच उफाळून येण्याची शक्यता अधिक.

बालकांच्या योग्य वयात त्यांच्या विकासाला कारणीभूत ठरणारे असे योग्य अनुभव मिळावे लागतात. याउलट, ज्या वयात जे पेलत नाही ते दुसयांच्या आग्रहांमुळे, हट्टांमुळे असमजेमुळे करावे लागले, तर त्याचा विघातक परिणाम मेंदूवर म्हणजे पर्यायाने मेंदूच्या बौद्धिक क्षमतेवर होतो. सेमी-इंग्रजी घेणाया मुलांच्या बाबतीत हे असे घडते आहे. संबंधित लोकांना हे समजले पाहिजे.

आपण सेमी-इंग्रजीमधील गणित व विज्ञानाची गोष्ट पाहू. पहिलीच्या स्तरावर मराठी मुलांना इंग्रजी अजिबात येत नसते. शिवाय विषय शिकण्याची ती पहिली पायरी असते. विषय आयुष्यात प्रथमतःच शिकायचे आणि त्याच वेळी इंग्रजी हाही एक विषय नव्याने पहिल्यांदाच शिकायचा, अशा परिस्थितीत ही मुले असतात. ह्या दोन्हीही गोष्टी मुलांना सुरुवातीला अवघडच जातात. (हे दोन-चार इयत्ता शिकूनही साधे नीट लिहिता-वाचता येत नाही अशा मुलांच्या मोठ्या संख्येवरूनही सहज लक्षात येते!) असे असताना सेमी-इंग्रजीचे फॅशनेबल फॅड आणून आपण चक्क नकळत्या मुलांच्या मेंदूवर अनाठायी भार लादत आहोत. परंतु मेंदूवर होणारा परिणाम बुक्का लावल्यासारखा बाहेरून दिसत नाही. पालकांना, शिक्षकांना, संस्थाचालकांना किंवा बेजबाबदार सरकारी अधिकायांना तो दिसण्याची शक्यता नाही; तो त्यांना भोगावा लागत नाही. तो भोगावा लागतो स्वतः त्या मुलांना. त्यांना येणारा कंटाळा, शिकण्याची निर्माण होणारी नावड, भुकेवर होणारा परिणाम, उदासीनता ही त्याची काही चिन्हे असतातही; पण प्रौढ

समाज त्यांकडे कायमच डोळेझाक करीत आला आहे. पण हा आघाती अन्याय इथेच संपत नाही. मुलांना न येणारे गणित वा विज्ञान तर शिकायचेच असते, न येणारी इंग्रजी भाषाही शिकायची असते. एवढेच नव्हे तर न येणारे गणित, विज्ञान हे विषय न येणाऱ्या इंग्रजीतून शिकावे लागतात. 'अधिकस्य अधिकम् हालम्' अशी त्यांची अवघड स्थिती होते. न येणाऱ्या भाषेतून शिकणे ही किती अवघड गोष्ट असते, याची आपण प्रौढांनी कल्पनाच करायला हवी.

न येणाऱ्या भाषेतून विषय शिकणे याचा अर्थ असा, की भाषा शिकता शिकता (म्हणजे ती भाषा पूर्णपणे न येताही) शालेय विषय शिकणे होय. म्हणजे, योग्य माध्यम हाती नसतानाही साध्याच्या दिशेने धावणे होय. याचा गंभीर परिणाम साधन भाषेपेक्षा साध्य करावयाच्या गणित--विज्ञानाच्या ज्ञानप्राप्तीवर होऊ लागतो. एखादा शालेय विषय भाषेच्या अपुऱ्या तयारीनिशी शिकणे व तोच विषय भाषेच्या पुऱ्या तयारीने शिकणे यांत खूप फरक असतो. अपुऱ्या भाषेने विषय शिकताना तो पुरेसा समजावून घेतला जात नाही, विषय कायम कच्चाच राहतो. फक्त प्रश्नोत्तरांच्या घोकंपट्टीवरच मुले निभावून नेतात. उत्तीर्ण होतही जातात, पण विषयांचा पाया कायमच्यासाठी कच्चा राहण्याचीच शक्यता जास्त. पूर्णपणे इंग्रजीतून शिकू पाहणाऱ्या विद्यार्थ्यांनाही ही अडचण भेडसावते. पण, तेथे एक गोष्ट मुलांच्या मदतीला येते. तेथे इंग्रजी येणारे, इंग्रजीतून सहजपणे संभाषण करणारे शिक्षक प्रामुख्याने नेमले जातात. ते विद्यार्थ्यांना बोली इंग्रजीचा सराव सातत्याने देत जातात. मुले जेव्हा इंग्रजीतून परस्परसंवाद साधू लागतात, तेव्हा त्यांना भाषा अवगत होण्याचा मार्ग मिळालेला असतो, त्याकरवी मुले विषय शिकू पाहतात. म्हणजे इंग्रजी माध्यमाच्या शाळांतून भाषेच्या तयारीवर भर देऊनच मुलांना विषयांना भिडण्यास भाग पाडले जाते. त्यामुळे त्या वेळी मुलांवर येणारे ताण काही प्रमाणात तरी सैल होतात. पण तेथेसुद्धा वरच्या इयत्तांमध्ये जाईपर्यंत सुरुवातीला न येणाऱ्या इंग्रजी भाषेतून विषय शिकणे, नंतर इंग्रजीच्या अपुऱ्या तयारीनिशी आणि ते-सुद्धा सर्वच विषय शिकणे याचे ताण मुले सहन करतातच. तसेच सर्वच विषयांचा पाया कच्चा राहण्याची तयारीही ती करून ठेवतात. घोकंपट्टीचा आसरा घेऊनच परीक्षा पार करीत जातात. यातून 'शिकणे' होते, पण 'समजणे' राहूनच जाते.

मराठी माध्यमाच्या शाळांतील परिस्थिती फारच वेगळी आहे. येथे बहुसंख्य शाळांमधून स्वतःला येत असलेल्या मराठी भाषेतून विषय शिकतानाही मुलांची पंचाईत होत असते. त्यात पुन्हा सेमी-इंग्रजी सार्वत्रिक् करण्याचा सपाटा लावून सारा मराठी समाज गुलामगिरी-बरोबरच आपल्या क्रूरतेचेही प्रदर्शन करत आहे. मराठी शाळांतून अस्खलित इंग्रजी येणारा शिक्षक अभावानेच आढळेल. सामान्य परिस्थिती अशी आहे, की इंग्रजी न येणारा शिक्षक, इंग्रजी न येणाऱ्या विद्यार्थ्यांना इंग्रजीतून गणित-विज्ञान शिकवायला सज्ज झाला आहे. आपल्याला हे काम जमणार नाही, हे त्याला पक्के ठाऊक आहे. पण तो शासनाचा गुलाम आहे. शासनाच्या विरुद्ध ब्र काढण्याचाही धीटपणा त्याच्या अंगी नाही. त्यामुळे तो आपल्याला न पेलणारे आव्हान मुकाटपणे पेलू पाहतो आणि विद्यार्थ्यांचे नुकसान करण्यात सामील होतो. या परिस्थितीतही सेमी-इंग्रजीची आग्रही भूमिका घेणारे शासन, अशीच आग्रही भूमिका घेणाऱ्या पालकांना चक्क फसविण्याचा उद्योग करीत आहे.

वास्तविक मराठी मुलांनी सर्व विषय थेट दहावी-बारावीपर्यंत मराठीतून शिकावे व उत्तम शिक्षण प्राप्त करावे, याला पर्याय असूच शकत नाही. सेमी-इंग्रजीचे हे धेडगुजरी प्रकरण अंतिमतः मुलांचे शैक्षणिक नुकसान करणारेच आहे. शालेय शिक्षणासाठी इंग्रजीचे माध्यम आणि हे शिखंडी सेमी-इंग्रजीचे माध्यम ह्यांचा एक गंभीर सामाजिक आणि भाषिक परिणाम पसरताना दिसतो आहे. इंग्रजीतून वा इंग्रजी न शिकलेले आईबाप, मुलांनी इंग्रजी शिकायला सुरुवात केली, की घरगुती बोलण्यात इंग्रजी शब्दांचा योग्य वा अयोग्य पण वाढता वापर करू लागतात. त्यांन इंग्रजी भाषा येत नसते, पण इंग्रजी शब्द ओळखीचे होतात. मग ते, बाटली ला 'बॉटल' आणि पाण्याला 'वॉटर' म्हणू लागतात. मग इंग्रजी शब्दांचा वाक्यांतून वापर होऊ लागतो. "आता जागू नकोस 'स्लीप' बरं; उद्या मॉर्निंगला लवकर उठायचं आहे." अशी वाढती मिश्रित स्वरूपाची वाक्यरचना

करीत जाऊन आपली मराठीही इंग्रजीच्या वापराने प्रदूषित करू लागतात. आता घरोघर मुलांना आई-वडील राहिलेलेच नाहीत; त्यांना 'पप्पा' नि 'मम्मी' असतात. इंग्रजीचा गंड हा अशा घरगुती भाषेच्या करवी मुलांवरच आघात करू लागला आहे. आमच्या काळी मुलांना अस्खलित मराठी येत असे, ते खूप सुंदर वाटत असे.

माझ्या पिढीच्या बऱ्याचशा, म्हणजे जवळ जवळ शिकणाऱ्या सर्वच मुलांनी छान मराठीतून शालेय शिक्षण घेतले. त्याच वेळी, इंग्रजी ही एक दुय्यम भाषा म्हणून सातवीपासून किंवा पाचवीपासून शिकण्यास सुरुवात केली. मराठीसारखी एक भाषा संपन्नपणे हाती असल्यामुळे इंग्रजी भाषा शिकणे फारसे अवघड गेले नाही. परिणामतः पदवी पातळीपर्यंत उत्तम शिक्षण, मराठीची उत्तम जाण आणि इंग्रजीची पुढील शिक्षणासाठी आणि आवश्यक त्या व्यवहारांसाठी पुरेशी जाण घेऊन आम्ही शिक्षणाच्या औपचारिक मांडवातून बाहेर पडलो. किती व्यवस्थित व परिणामकारक असे हे भाषिक धोरण होते!

दुर्दैवाने, आजच्या विद्यार्थ्यांसाठी मात्र, आजचे धोरणी सरकार साधे, सरळ, उपयुक्त, ताणरहित, शिक्षणाची उद्दिष्टपूर्ती करणारे, भाषासंपन्न करणारे असे धोरण आखू शकत नाही. पालकवर्ग तर कसल्यातरी स्पर्धेच्या अनामिक भीतीने ग्रासलेला असून शिक्षणसाध्यापेक्षा भाषामाध्यमालाच देव मानू लागल्याचे चित्र सार्वत्रिकरीत्या पसरलेले आहे. अशा घसरत्या शिक्षणकाळात, पालकांच्या प्रबोधनाचे आणि सरकारच्या हातांवर सटासट छड्या मारून त्याला सरळ करण्याचे काम येती काही वर्षे जाणत्यांना करीत राहावेच लागेल.

या सर्व गोंधळाच्या परिस्थितीतही, आपल्या मुलांना मराठी माध्यमातून शिकविण्याचा जाणीवपूर्वक आग्रह धरणारे पालक आहेत. आपणहून सेमी-इंग्लिशचा पर्याय आपल्या मुलांसाठी नाकारणारे पालक आहेत. एवढेच नव्हे, तर इंग्रजी माध्यमांतून शिकणाऱ्या आपल्या मुलांची दयनीय अवस्था ओळखून आपल्या पाल्यांना इंग्रजी माध्यमातून काढून पुन्हा मराठी माध्यमाच्या शाळेकडे वळविणारे पालकही आहेत. सरकारला न जमणारे बरेच काही स्वतः पालकच करू शकतील, हे दर्शविणारी ही सुचिन्हे आहेत!

आपल्या मुलांचे शिक्षण हा सरकारचा निर्णयप्रांत नाही, हे पालकांना चांगले कळलेले आहे!

***

# गरिबी रेषा : मिथक, पथ्य आणि तथ्य

शि. ना. माने

सुरुवातीलाच राजकीय व सामाजिक व्याजोक्ती (Satire) म्हणून लोकमान्य झालेल्या जोनाथन स्विफ्ट यांच्या गलिव्हर्स ट्रॅव्हल्स (वस्तुतः ट्रॅव्हेल्स) या पुस्तकाची न चुकता आठवण होते. पुस्तक लिहिण्याचा हेतु स्पष्ट करताना लेखक म्हणतात, की सुज्ञांना लटक्या समाधानातून बाहेर खेचणे तसेच त्यांच्या चुका व भ्रष्ट वर्तन करण्याच्या क्षमतांविषयी त्यांच्या ठिकाणी पूर्ण जाणीव निर्माण करणे. एकदा पुस्तकाचा नायक गलिव्हरचे लॅपुटा या प्रदेशात आगमन होते. या प्रदेशाची जनरीत अशी होती, की तेथे शास्त्रीय सच्चेपण (Scientific ingenuity) व सामाजिक हेतू यांची फारकत झाली आहे. आणि उपयुक्ततेऐवजी बोलक्या वर्गाच्या हुशारीला बक्षीस मिळते. गरिबी व गरिबी रेषा यांच्याविषयीची ताजी आकडेवारी म्हणजे लॅपुटातील जनरीतीची एक प्रतिकृतीच म्हणता येईल.

आज गरिबी व गरिबी रेषा यांच्याविषयीच्या योजना आयोगाच्या निष्कर्षाच्या संबंधात देशात शीतयुद्ध सुरू झाले आहे. काय आहे योजना आयोगाची आकडेवारी? ग्रामीण भागात दरडोई दर दिवशी रु. २७ व नागरी भागात दरडोई दर दिवशी रु. ३४ इतका किमान सेवन खर्च करणारी व्यक्ती ही गरिब नाही. ही आहे गरिबी रेषेची व्याख्या. आणि गरिबी रेषेच्या आधारे २००४-०५ ते २०११-१२ या काळात गरिबांच्या संख्येत ३७ टक्क्यावरून २१.९ टक्क्यांपर्यंत घट झाली. म्हणजेच गरिबांची संख्या १५.१ टक्क्याने घटली. वस्तुतः या १५.१ टक्के घटीच्या संबंधात सुरू झालेल्या शीतयुद्धाचे कारण गरीब व गरिबी रेषा या संकल्पनांच्या सिद्धान्तन व वस्तुरूपता किंवा वास्तवता यांच्यातील सूक्ष्म फरकात दडले आहे. म्हणून त्या संबंधातील आकलन महत्त्वाचे आहे. आजपर्यंत गरिब व गरिबी रेषा यांची चिकित्सा प्रतिमानावर आधारित आहे आणि पुढेही ती तशी राहणार आहे. त्याचबरोबर आपण हेही ध्यानांत घेतले पाहिजे, की अर्थशास्त्राचे हे अवलंबन चेष्टेचा व कुचेष्टेचा विषय झाले आहे. ते अंशतः खरेही आहे. परंतु लोकांना काय हवे ते देणे व त्यांनी कशाची मागणी करावी व करू नये हे त्यांना सांगणे, यांच्यातील मूलभूत सीमारेषेचे अस्तित्व मान्य करावेच लागते. आणि येथेच मेख आहे. अर्थशास्त्रातील मूलभूत तथ्यांची उकल करण्याचा हाच एक लक्षणीय व नाट्यमय मार्ग आहे. अर्थशास्त्रासारख्या सामाजिक शास्त्रावरील ती मर्यादाही आहे. दूरची वस्तू दूरदर्शक यंत्रात (Telescope) जशी टिपता येते, तसे अवाढव्य मानवरूप व्यवहार लीलया दूरदर्शकबद्ध करता येत नाहीत. दांडेकर-रथ, मिन्हास, सुखात्मे, दांतवाला आणि आता तेंडूलकर यांच्या गरिब व गरिबी रेषा यांच्या प्रतिमानांची कुचेष्टा करणारांनी या मर्यादेचे आव्हान स्वीकारावेच. अर्थात, या प्रतिमानांच्या पद्धतीविषयी मीमांसा करण्याचा त्यांचा हक्क कोणी काढून घेऊ शकत नाही. स्पष्टीकरणासाठी 'मागणी' या अर्थशास्त्रातील संकल्पनेचा उल्लेख करू. फ्रेडरिक बेन्हॅम यांची मागणीची नेटकी व सुबोध व्याख्या प्रसिद्ध आहे. "एखाद्या वस्तुची विशिष्ट किंमतीची मागणी म्हणजे त्या वस्तूचे विशिष्ट वेळी त्या किंमतीला विकत घेतले जाईल असे परिमाण होय." थोडक्यात, मागणी नेहमी किंमतीत अभिव्यक्त होते. (डिमांड फॉर एनीथिंग, ॲट अ गिव्हन प्राइस, इज दी अमाउंट ऑफ इट विच बिल बी बॉट पर युनिट ऑफ टाइम ॲट दॅट प्राइस; इकॉनॉमिक्स, १९५५, पृ. १७४) थोडक्यात, डिमांड इज अल्वेज ॲट अ प्राइस.

समजा, वर्गात अर्थशास्त्राच्या शिक्षकाने मागणीचे स्पष्टीकरण करताना जॉर्ज ऑर्वेलीय समाजवादाच्या थाटात पुढील विधान केले : गरीब विधवेंच्या बाळांसाठी दुधाची गरज असताना ते श्रीमंत रॉकफेलर यांच्या कुत्र्याकडे जाते. त्या वेळी स्पष्टीकरणात ते शिक्षक कमी पडले. मात्र वैयक्तिक मताच्या अनावश्यक प्रदर्शनात ते यशस्वी झाले. अर्थात, हे तथ्याला धरून झाले नाही.



अनुक्रमणिका

कारण सिद्धान्तनाच्या वस्तुनिष्ठ (Objective) स्पष्टीकरणाचे पथ्य ते विसरले. परिणामी, मागणीच्या व्यक्तिनिष्ठ स्पष्टीकरणाच्या मिथकाचे त्यांना धनी व्हावे लागले. खरेतर, त्या बाळाला व तशाच दुसऱ्या बाळांना 'दूधपुरवठा' करण्याचा त्यांनी विडा उचलावयाला हवा होता. बाजार आदर करतो, मागणीचा (जी नेहमी किंमतीत अभिव्यक्त होते), गरजांचा (Needs) नव्हे. बाजाराच्या या तथाकथित त्रुटीचे सरकारने जरूर निवारण करावे. त्या वेळी सरकारने दूधबाजाराचा सहायक म्हणून काम करावे. त्या बाजाराचा पूर्ण पर्याय असलेल्या पितृत्वाचे किंवा मातृत्वाचे '१२ रुपयांत भरपेट जेवण' यासारखे सोंग करू नये. नुकताच अन्नसुरक्षा विधेयकाच्या संबंधातील अध्यादेश काढून अशा सोंगाची सरकारने एक चूक केलीच आहे. एक वेळ बाळाला दुधाची गरज असताना ते न मिळणे हा बाजारातील (बाजाराच्या नव्हे) त्रुटीचा परिणाम असू शकतो. त्यासाठी गरिबी रेषेला किंवा बाजाराला सरसकटपणे जबाबदार धरणे वाजवी व सयुक्तिक नव्हे. अशा परिस्थितीत अपेक्षित बाजारसुधारणा किंवा गरिबी रेषेत सुधारणा (रंगराजन समिती कार्यरत आहेच) हे मार्ग उपलब्ध आहेत.

आता विशिष्ट मर्यादेत अर्थशास्त्रातील प्रतिमानावरील मूलभूत मर्यादेच्या प्राथमिक आकलनानंतर योजना आयोगाच्या गरिबांच्या १५.१ टक्के घटीविषयीच्या दाव्याविषयी दोन शब्द. दुसऱ्या शब्दांत, ग्रामीण क्षेत्रात व नागरी क्षेत्रात दरडोई दरदिवशी सेवनखर्चाची किमान पातळी अनुक्रमे रु.२७ व रु. ३४ (गरिबी रेषा) पुरेशी आहे काय? अर्थात, तो दावा किती खरा किंवा खोटा, याचा सप्रमाण खुलासा करण्यासाठी त्याची खिल्ली उडविण्याची गरज नाही. त्यासाठी गरज आहे मूलभूत गरजा दृष्टिकोनाचा (Basic Needs Approach) आधार घेण्याची.

मूलभूत गरजा दृष्टिकोन पुढील दोन घटकांवर जोर देतो. पहिला प्राकृतिक किंवा भौतिक निर्वाह आणि दुसरा मूलभूत मानवरूप हक्क. गरिबी रेषा या दोन घटकांचा आधार घेते. आणि जागतिक पातळीवर आंतरराष्ट्रीय श्रम कार्यालयाने (ILO) १९७६ मध्ये हे दोन घटक अधोरेखित केले आहेत. त्यात पुढील तीन घटकावयवांचा समावेश करण्यात आला आहे–

१) कुटुंबासाठी किमान आवश्यकता (Requirements) : पुरेसे अन्न, आसरा व वस्त्र.

२) सारभूत (Essential) सेवा : सुरक्षित पेयजल, स्वच्छता, सार्वजनिक वाहतूक, आरोग्य व शैक्षणिक सुविधा.

३) अधिकतर मूलभूत दृष्टिकोनातून मूलभूत गरजाभिमुख धोरण : त्यात लोकांवर परिणाम करणाऱ्या निर्णयप्रक्रियेत लोकसहयोग किंवा लोकसहभाग सूचित केला आहे.

वरील किमान आवश्यकतांतर्गत पुरेसे अन्न हा घटकावयव केवळ किलोग्राम परिमाणापुरता मर्यादित ठेवणे अपेक्षित नाही. आहारतज्ज्ञ पांडुरंग सुखात्मे यांनी जोर दिलेल्या अन्नातील पोषक मूल्यापर्यंत तो (Nutritive Value) विस्तारण्याची गरज आहे. गरिबीच्या ऑक्सफर्ड शब्दकोशाच्या एका व्याख्येत 'दर्जा व राशी किंवा रक्कम यांचा अभाव असणे' असा खुलासा आहे. म्हणजे दरडोई दरदिवशी सेवन खर्चाची किमान पातळी रु. २७ व रु.३४ यापेक्षा वाढविणे अनिवार्य आहे. दर्जा व सेवनवस्तूमधील, विशेषतः अन्नधान्यातील, पोषण-मूल्यावर भिस्त आहे. तसेच रकमेत किंवा राशीत पुरेशी क्रयशक्ती अभिप्रेत आहे. टनभर किंवा मणभर परिमाणाला दुय्यम स्थान देण्यात आले आहे. तात्पर्य, रु. २७ व रु. ३४ सेवन खर्चाच्या आकड्यात पुरेशा पोषक मूल्याची व पुरेशा क्रयशक्तीची क्वचितच हमी मिळते. वरील क्र. २ घटकावयवांतर्गत निरुत्तर करणारे अनेक प्रश्न निर्माण होतात. सुरक्षित पेयजल किती लोकांना उपलब्ध होते? किती लोकांना ते परवडते? नसेल तर सरासरी ५० टक्क्यांच्या जवळपास प्रदूषित पाण्यापासून उद्‌भवणाऱ्या रोगांवर इलाज करण्यासाठी सेवन खर्चात वाढ करणे अपरिहार्य नाही काय? याच घटकावयवांतर्गत शैक्षणिक सुविधांविषयी काय बोलावे? न परवडणारा खर्च करूनही रोजगार किंवा नोकरी मिळेल, याची खात्री नाही. मागील काही दशकांपासून भारतातील ज्ञान अर्थव्यवस्थेचे (Knowledge Economy) ऱ्हासपर्व सुरू आहे. एक सँपल म्हणून २००५ च्या जागतिक बँकेच्या 'नॉलेज इकॉनॉमी' अहवालातील एका निष्कर्षाचा उल्लेख करू. दरवर्षी भारतातील विद्यापीठांतून जवळपास

२ लक्ष शास्त्रज्ञ, अभियंते व तंत्रज्ञ बाहेर पडतात. परंतु श्रमबाजार व शिक्षण यांच्यात संपूरकतेचा प्रचंड प्रमाणात अभाव (Mismatch) म्हणजे विसंगती आहे. तिसऱ्या घटकावयवांतर्गत निर्णयप्रक्रियेतील सहभागाची परिस्थिती गंभीर आहे. अधिकतर योजना व प्रकल्प वरून लादले जातात. परिणाम? बेहिशेबी किंवा गैरहिशेबी परिव्यय वाढ (Overrun cost), साधनसामग्रीचा अपव्यय, कार्यदक्षतेचा बळी, सामाजिक कल्याणातील तोटा इत्यादी. त्या तोट्याची भरपाई कशी करणार? ग्रीक पुराणातील सिसीफसच्या मिथकाचे स्मरण करणारी गरिबी कधीही न हटविणारी 'गरिबी हटाव' सारखी न संपणारी योजना राबवून? किंवा परिव्यय-प्रभावी (Cost-effective) नवप्रवर्तन व उपक्रमित्व यांच्यावर विशेष जोर देऊन?

वरील तीन घटकावयवांच्या मर्यादित चर्चेतून पुढील तात्पुरत्या स्वरूपाचा निष्कर्ष येतो–सुरुवातीला उल्लेख केलेल्या लॅपुटा प्रदेशातील जनरीतीप्रमाणे योजना आयोगाला १५.१ टक्के गरिबीघटीचे लटके समाधान मिळेलही. परंतु त्यामुळे शास्त्रीय सच्चेपणाच्या सामाजिक हेतूला समाजातील बोलक्या वर्गाचा दुय्यम म्हणून जगावे लागते. त्याचा हिशेब कोण व कसा चुकता करणार?

***

पुस्तकपरीक्षण

# तटस्थ वृत्तीचा आढळ 'निरिच्छ नभ' : एक आस्वाद

पंडितराव पवार

कविता या तरल वाङ्मयप्रकारात बऱ्याचदा कवीचा आत्मनिष्ठ आविष्कार असतो. त्यामुळे कवितेत कवीचे आत्मचिंतन आणि त्याचे जीवनतत्त्वज्ञानही प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष प्रकटत असते. परंतु काही कवी अत्यंत ताटस्थ्याने आपल्या भावभावना आणि विचारांना कवितेत आविष्कृत करतात. येथे कवी सापेक्षतेपेक्षा निरपेक्ष वृत्तींना आपल्या कवितेत जागा देताना जाणवतात. किंबहुना कमळाचे जसे पान पाण्यात राहूनही निर्लेप राहते, तशी काहीशी भूमिका अशा तटस्थवृत्तीच्या कवींची असते. कवी विनायक पाटील यांच्या 'निरिच्छ नभ' या कवितासंग्रहात अशी सापेक्षतेच्या पलीकडील निरपेक्ष वृत्ती प्रकटली आहे, असे कवितेचा आशय तपासता ध्यानी येते. 'निरिच्छ नभ' या कवितासंग्रहाच्या शीर्षकाचा अन्वयार्थही लक्ष्यार्थाने तीच वृत्ती सूचित करतो. हा कवी वास्तव जगताना निरिच्छ आहे. मोहाच्या गुंताळ्यातून लांब आहे. आणि त्याच्या जीवनाचा अवकाशही 'नभा'सारखा विशाल आहे.

**डोळस समाजभान :**

आज समाजजीवनात आर्थिक, धार्मिक, जातीय, राजकीय कारणांनी अस्वस्थता आहे. अशा परिस्थितीत 'दंगा'ही घडविला जातो. अशा वेळी जातीय हिंसा होते. त्या हिंसेत प्रत्येकाचा काहीतरी स्वार्थ असतोच. पण हा कवी मात्र जखमेवर मीठ चोळण्याऐवजी 'आसू पुसणारा हात आमुचा होता' असे डोळस समाजभान जपून समाजात संवाद साधण्याचा प्रयत्न करतो. कवीची ही भूमिका निरपेक्ष वृत्तीची आणि समाजाला आश्वस्त करणारी आहे.

'रस्ता म्हणजे मातीचे दबलेले ऊर,

झोपड्या म्हणजे जीवनाचे चुकलेले सूर.' (पृ.५०)

या ओळींतील झोपडपट्टीतील लाचारीचे जीवन जगणारी आणि 'सर्व सोसून'ही उद्याचा आशावाद बाळगणारी माणसे म्हणजे समाजातील विषमता दर्शविणारी प्रतीके आहेत. जीवनाकडे डोळस आणि भेदक दृष्टीने पाहण्याची कवीची ही दृष्टी चिंतनशील समाजमनस्कतेची आहे. या झोपडपट्टीतील माणसांचे जीवन हे समाजाचे चुकलेले 'सूर' आहेत. ते विषमतेचे फलित आहे. परंतु अशाही लाचारीच्या जगात 'पळसाचे झाड' फुलण्यासाठी आशावाद सूचित करते. तोच जीवनाचा गतिमान प्रवाह कुणीही नाकारू शकत नाही. त्यातच 'मातृत्वा'च्या नवजीवनाच्या खुणा असतात.

**निरपेक्ष जीवनानंद :**

बालपणातील निरपेक्ष 'मैत्रीचा तृप्त' हात कवीला आजही आभाळ ओथंबून टाकणारा जीवनानंद देतो. सहवाससुखात माणूस इतरांना काय देतो हे जीवनकलहात ध्यानी येत नाही. पण अजाणताही आपल्या सावलीत 'जे जळाले त्यांचे सोने' झाल्याचा आनंद मात्र कवीला अवीट समाधान देतो. प्रत्येकाची जीवनवाट स्वतंत्र असते. पण त्या गुंताळ्यात न अडकता 'आपली वाट आपणच चालायची असते', ही निखळ निरपेक्ष जीवनदृष्टी हा कवी जपतो. आपल्या 'अंतरीची व्यथा' जपतच वाटचाल करायची असते. कारण सांजवेळ प्रत्येकाला अटळ असते. अशावेळी,

'क्षितिज कवटाळताना असे। दिशांचे बंध सैल होतात'

ही मृत्यूची चाहूल देणारी 'पंखझड' कवी अनुभवतो. यात परिपक्व जीवनजाणिवेचे आणि मृत्यूचेही स्वागतसूचन आहे. पण यात आक्रस्ताळेपणाऐवजी स्वागताचीच भाषा आहे.

'रोज चेहरा बदलवून मृत्यू भेटला तरी। आमची मान ताठ असते.'

हा जीवनसंघर्षातील स्वाभिमान जाज्वल्यपूर्ण आहे. 'सारे आसमंत रिते रिते' असल्याचे काही क्षण हा कवी अनुभवतो. पण जीवन सोडून पळण्याची भाषा मात्र या कणखर व्यक्तित्वात नाही. शिवाय जीवनात अवास्तव मोह किंवा अपेक्षा नसल्याने अपेक्षाभंगाचे दुःखही येथे नाही. कारण,

अनुक्रमणिका

'आकाशी भिडण्या। मीही झेप घेता
आकाश अनंत। उमगले.'

जीवनध्येयात आकाशी झेप घेणारा हा कवी आकाश धुंडाळताना 'अनंत' आकाशमय होऊन जातो. त्यामुळे जीवनातील सुख-दुःख, मोह-माया या गुंताळ्याला बाजूला सारून या निरिच्छ नभाचाच एक भाग होतो. या सर्व कवितांचा आशयही वाच्यार्थापलीकडे जाऊन व्यंग्यार्थापर्यंत वाचकांना घेऊन जातो. 'आकाशाला आपलंसं करताना स्वतः झोकून द्यावं लागतं. अंतःकरणात तशी धग निर्माण व्हावी लागते आणि पार्थिवाची जाणीवही ठेवावी लागते', हे प्रा. भी. रा. जहागीरदार यांचे या संदर्भातील मत म्हणून महत्त्वाचे वाटते.

**नितळ निसर्गचित्रण :**

'निरिच्छ नभा'तील निसर्गही सहजपणे आपले नितळ रंगरूप घेऊन अवतरतो. जीवनचिंतन आणि प्रेमानुभव-प्रकटीकरणात हा निसर्ग भर घालतो. उदा.,

'रानवाऱ्याला वेड असावे। शीळ घुमविण्याचे
क्षितिजावर कळीकळीतून पहाट अशी उमलत
यावी.'

या काव्यपंक्तींतील वारा आणि पहाटेचे तरल सौंदर्य गोचर करण्याचे सामर्थ्य विलक्षण आहे.

'सर झडून जाते अन्। उतरतो रित्या ढगांचा प्रवास।
मी तेवढ्यापुरताच उरलोय.'

यातील जीवनाचे क्षणभंगुरत्व आणि निसर्गनियमांचा अन्वयार्थ कवीने मिताक्षरांतून सांगितला आहे.

जीवनरहाटीत खंड पडत नाही, हाच निसर्गनियम आहे. 'उगवे ते नाशे' हाही सृष्टीचा नियम आहे. एकीकडे कवाडे बंद होतात. दुसरीकडे बंध मोकळे होऊन जीवनप्रवाह चालतच राहतो. 'पुनः पहाटे बंद कृष्णकमळ। अन् निरिच्छ नभ' हा सृष्टीचा अवकाश कवी गूढात्म पातळीवर अनुभवतो. कृष्णकमळाची गूढता जशी अव्यक्त, तशीच निरिच्छ नभाची विशालताही कवेत घेता न येणारी. कवीची ही गूढरम्य जीवनदृष्टी व्यक्त करण्यास नितळ निसर्ग असा व्यामिश्र पण तितकाच नितळ रूपात येथे अकल्पितपणे व्यक्त होतो. त्यामुळे विशाल आकाशही कधी कधी तारेवरच्या चिमणीच्या पंखाआड लपून बसते. हे कल्पनासौंदर्य म्हणजे कविप्रतिभेचा विलक्षण चमत्कार आहे. येथे सोसाट्याचा वारा नाही, की लाटांचे थैमान घालणारा समुद्रही नाही. बालकवींच्या निसर्गदृश्याच्या पुनःप्रत्ययाची ही कविता वाटते. कारण निसर्गाच्या सूक्ष्म, तरल आणि अस्सल सौंदर्याची येथे प्रतीती येत राहते. वृक्षाच्या सावलीतील 'म्हातारा अंधार' शीळ घालताना प्रत्ययास येतो. तो भास नसून पाहिलेला वास्तव निसर्ग आहे. सामान्य आणि असामान्यांचा संघर्ष सूचित करताना कवी म्हणतो–

'डोळ्यातल्या बाहुलीला। कसे पेलावे आकाश'

त्याप्रमाणे येथेही सार्थ निसर्गप्रतिमा अर्थवती होतात. त्यातून सामाजिक व्यथा-वेदनाही बोलक्या होताना जाणवतात. कवीच्या चोखंदळ आणि सौंदर्यान्वेषी मनाचे ते द्योतक आहे.

**प्रेमभावनेचा संयमित आविष्कार :**

'निरिच्छ नभ' मधील प्रेमभावना उत्कट करणारी असूनही संयमित शब्दांत व्यक्त होते. शारीरिक आकर्षणापेक्षा मूक नजरेतून ही प्रेमभावना प्रकटते.

'निळ्या पापण्यांच्या आड सदा स्वप्नझुला झुले.'
'ओठातील हसू फुटू नये कधी,
मोगऱ्यातील मोतिया झडू नये कधी.'
'फुलाचं फुलणं असतं ना? तेच तुझं स्मित असतं.'
'अजून दिसताहेत तुझे धुंद डोळे। .... अजून तू
दिसत नाहीस.'
'छेडू नकोस असं परत परत। लाजेन माझा शब्द
नाही फुटत.
झुळकेनेही झडतात पिकल्या बोरी। तुझ्या शब्दाशब्दाने
येते घेरी.'

यांसारख्या प्रेमाविष्कार व्यक्त करणाऱ्या ओळींतून कवीचे शब्दप्रेम, निसर्गाचा प्रेमभावनेच्या आविष्करणासाठी केलेला वापर, सौंदर्यप्रेम आणि संयम वाखाणण्यासारखा आहे. येथे शारीरिक दंगामस्ती नाही. भडक, उत्तान सौंदर्याविष्कार नाही. आहे तो आंतरिक प्रेमजिव्हाळा आणि मार्दव. छेड काढण्यापेक्षा मुग्धतेतच खरे प्रेम आहे. कारण साध्या झुळकेनेही पिकलेल्या बोरी बदाबदा पडतात. तेथे दंगामस्तीची गरज नाही. कारण 'मनातल्या राजाला ऐकू जाणार नाही अशी मनाशी गुणगुणणारी' ही प्रेयसी 'मुग्धा' आहे. ती अवखळ नाही.









**अर्थपूर्ण शब्दकळा :**

'निरिच्छ नभ' या कवितासंग्रहात चव्वेचाळीस कविता समाविष्ट आहेत. मात्र या कविता आकाराने तीन ओळींपासून दहा-बारा ओळींपर्यंतच्या आहेत. याचा अर्थ या कविता अल्पाक्षरी आहेत. परंतु त्यांतील आशयघनता विलक्षण अर्थवाही आणि चिंतनशील आहे. कवीच्या जीवनात मुरविलेल्या विविधांगी अनुभवांना शब्दांचा सोस नाही. नेटक्या आणि अर्थघन शब्दांची कवीची निवड कवितेला एक स्वयंपूर्ण रूप प्राप्त करून देते. काही अपवाद सोडल्यास अलंकार, प्रतिमा या काव्यविशेषांपासून ही कविता लांबच राहते. म्हणून कमीत कमी शब्दांत काव्याशय प्रकटण्याचे कौशल्य हेच या कवितेचे सामर्थ्य आहे. जीवनातील सुख जसे कवी मितशब्दांत व्यक्त करतो, त्याप्रमाणे दुःखही संयमित शब्दांतून सुचवितो. म्हणून ही कविता आजच्या युगातही प्रसिद्धिसन्मुख आत्मप्रौढी आणि ऊरबडवेपणा या दोन्हीपासून अलिप्त आहे.

'भुईचिड्यांची घरटी', 'लगडलेल्या बोरी', 'आठवणीचं ओझं', 'आसवांचे मोती', 'चांदण्याची बाधा', 'स्वप्नझुला', 'पंखझड', 'सांजवेळ', 'गात्रागात्रांचे कलेवर', 'थकल्या वाटा', 'मातीचा टिळा', 'भाबडी माती' यांसारख्या रूपरसगंधाच्या विविध प्रतिमा कवीच्या कल्पनासृष्टीतील नसून सूक्ष्म निरीक्षणाच्या द्योतक आहेत. त्यामुळे कविता अल्पाक्षरी असूनही अर्थगहन झाली आहे. कारण या कवितांतील शब्दप्रतिमा म्हणजे अर्थग्रंथी आहेत. तसेच द्रौपदीच्या मिथकाची पुनर्निर्मितीही अर्थपूर्ण आहे. भुईचिडयांची घरटी वादळवाऱ्यातही शाबूत राहतात हे कवीचे निरीक्षण अस्सल देशीपणाचे द्योतक आहे. कवितेत अधिकउणा शब्द नाही. कवीच्या शब्दांत 'नाही खुपला। आसू पापणीला। नाही इथे। शब्द उपरा' यात कोणतीही अतिशयोक्ती नाही. आणि हेच या कवितेचे मोठेपण आहे. एक अर्थवाही, निरपेक्ष जीवनदर्शन घडविणारा हा कवितासंग्रह म्हणून त्याचे महत्त्व उल्लेखनीय आहे.

निसर्गाची पार्श्वभूमी, नभाचे गहिरेपण आणि त्यातून वाटचाल करणारा कवी हे मुखपृष्ठही अर्थपूर्ण आहे.

'निरिच्छ नभ' (कवितासंग्रह)
विनायक त्र्यं. पाटील.
शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर.
पहिली आवृत्ती - २००६.
मूल्य रु. ७०/-

***



अनुक्रमणिका






पुस्तकपरीक्षण

# महात्मा गांधी आणि भारतीय राज्यघटना

विश्वास दांडेकर

राष्ट्रपिता महात्मा गांधी यांचे भारतीय स्वातंत्र्य-लढ्यातले अग्रमानांकित स्थान हा वादविषय नव्हता, नाही. साधारण १९२० (लोकमान्य टिळकांचे निधन) ते जानेवारी १९४८ या अठ्ठावीस वर्षांचा इतिहास कुठल्याही दृष्टिकोनातून लिहिला, तरी गांधीजींचे स्थान डावलून वा नाकारून तो लिहिणे हा तथ्ये नाकारण्याचा म्हणजे बौद्धिक अप्रामाणिकपणाचा प्रकार होणार. हे मुद्दाम नोंदवावे लागले यासाठी की, मराठीत 'भारतीय स्वातंत्र्यसमर : सत्तावन ते सुभाष' अशी पुस्तके पूर्वी प्रकाशित झालेली आहेत, ज्यांत फक्त सशस्त्र कारवायांचा उल्लेख आहे. अर्थात या दंभाशेजारी 'आम्ही फक्त अहिंसेच्या मार्गाने स्वातंत्र्य मिळवले', असे ठसवत सशस्त्र कारवाया व त्यांतली माणसे अनुल्लेखाने नगण्य करण्याचा प्रयत्नही उभा आहेच.

हे जे राष्ट्रपित्याचे स्थान गांधीजींना जनतेने दिले, त्याच्या विस्तृत कारणांमध्ये शिरण्याचे इथे कारण नाही. इतके पुरे की, स्वातंत्र्याची प्रेरणा त्यांनी फुलवली, ती खेडोपाडी नेली. त्यासाठी कॉंग्रेसची संघटना व्यापक-मजबूत-नियमबद्ध आणि शिस्त पाळणारी अशी करण्यात गांधीजींचा वाटा मोठा. भारताच्या खेड्यांतली जनता स्वातंत्र्य आंदोलनाशी जोडल्याखेरीज फारसे काही साध्य होणार नव्हते. ही खेडोपाडी पसरलेली जनता बहुतांशी गरीब, नाडलेली व अशिक्षित होती. याचाच एक भाग म्हणजे पूर्वाश्रमींचे अस्पृश्य. त्यांची अवस्था आणखी वाईट. स्त्रिया चूल-मूल यांत अडकलेल्या.या सगळ्यांना स्वातंत्र्य मिळाले म्हणजे ब्रिटिश जाऊन स्वदेशी राज्यकर्ते आले एवढाच फरक पडणार असेल, तर आंदोलनात रस निर्माण होणे अशक्य होते. या सर्वांना आपल्या सध्याच्या परिस्थितीत सुखकर बदल होईल ही शक्यता जाणवल्याखेरीज त्यांचा स्वातंत्र्य आंदोलनात सहभाग कुठल्या प्रेरणेतून येणार ?

सामाजिक, आर्थिक प्रश्नांना हात घालणे, त्यासंबंधी जागृती, प्रचार, चर्चा, प्रगतीचे मार्ग चाचपणे हे सुरू करणे अपरिहार्य होते. परिस्थितीची ती गरज होती. या घुसळणीत कॉंग्रेसच्या अनेक प्रश्नांवरील ठरावांचा उगम आहे. अर्थात हे नवे प्रवाह पाश्चात्त्य जगासोबत घडलेल्या संपर्कामुळे अंकुरित झाले, हे मोकळ्या मनाने मान्य करायला हवे. हे नवे अंकुर फुटत असताना यांचा आंधळा स्वीकार भारताची सातत्य असलेली ५००० वर्षांची सांस्कृतिक वैशिष्ट्ये नष्ट करेल का, अशी भीतीही जाणत्या मंडळींना अस्वस्थ करत होती. प्रश्न होता सुवर्णमध्य गाठण्याचा. विचारमंथन-ठराव-मतभेद यांतून, परदेशातून अपरिहार्यपणे येणाऱ्या विचारांना आपलेसे करत 'देशी' वळण देण्याच्या प्रयत्नांमधून ही वाटचाल पाहता येते.

साहजिकच फाळणीनंतर उरलेला मात्र स्वतंत्र व सार्वभौम 'भारत' ज्या वेळी राज्यघटना घडवण्यासाठी एकवटला, त्या वेळी त्यामागच्या प्रवाहात घेतलेल्या भूमिका, पारित ठराव यांचे प्रतिबिंब राज्यघटनेत उमटणे स्वाभाविक होते. राजकीय पक्ष लोकलढे देताना त्यामागे जो वैचारिक, आर्थिक आणि सामाजिक आशय उभा करतात, तो सत्ता मिळताच लाभार्थींना संधी मिळेल अशा कार्यक्रमात जर परावर्तित झाला नाही, तर आपली फसवणूक झाली अशी लोकभावना होणे स्वाभाविक आहे. यासंबंधीचे निरनिराळ्या क्षेत्रांसाठीचे तपशीलवार कायदे-तरतुदी अर्थातच राज्यघटनेत करता येत नाहीत. ते काम पुढचे (Follow-up legislation.). मात्र काय घडवायचे आहे याचे मानचित्र त्यातल्या आशयाला प्राध्यान्य देत राज्यघटनेत आलेच पाहिजे.

या सर्व संभाव्य रचनेमागे एक नैतिक छत्र अर्थातच येणार. या नवस्वतंत्र देशाची पुनर्उभारणी करायची म्हणजे त्यामागे एक नैतिक भूमिका उभी हवी. अमेरिकन राज्यक्रांती, त्यानंतरची फ्रेंच, १९१७/१८ ची रशियन यांमागे हा नैतिक विचार होताच. भारताच्या स्वातंत्र्य






वाटचालीत सशस्त्र वा निःशस्त्र धाग्यांमध्येही तो दिसतो. हाही घटक राज्यघटना तयार करताना फक्त समोर नव्हता, त्यांचे एक दडपण म्हणण्यापेक्षा दरारा घटनाकारांच्या व्यक्तिमत्त्वावर होता.

अर्थात फक्त एवढीच पार्श्वभूमी नव्हती. ब्रिटिश राज्यवटीत, खासकरून १८५० नंतर अनेक गोष्टी घडवल्या गेल्या, ज्यांतल्या काही भारताच्या हिताच्याही होत्या. रेल्वे, पोस्ट, तारायंत्रे, टेलिफोन, वाफेच्या इंजिनांचे अनेक उपयोग, वीजनिर्मिती हे भौतिक क्षेत्रातले नवे. सर्व यादी इथे आवश्यक नाही. मात्र संपूर्ण भारताला कवेत घेणारी एक राज्यव्यवस्थेची चौकटही ब्रिटिश राजवटीत लागू झाली. भारतात पूर्वी अशा गोष्टी माहीतच नव्हत्या असे नव्हे. कौटिलीय अर्थशास्त्र हे एक उदाहरण म्हणता येईल. साम्राज्येही भारताला अपरिचित नव्हती. नंद, मौर्य, गुप्त, विजयनगर....यादी परिपूर्ण नाही. या मालिकेत मुघल व शेवटचे म्हणजे मराठा. मात्र यांपैकी कुठलेही साम्राज्य संपूर्ण भारताला नियंत्रणात ठेवणारे नव्हते. सोबत आधुनिक भौतिक साधनांच्या अभावी बातम्यांची देवाण-घेवाण, मालवाहतूक, प्रवास यांवर एक अपरिहार्य मर्यादा होती. संपर्कमाध्यमे व यातायात यंत्राधारित झाल्याने परिस्थितीत एक मूलभूत फरक पडला होता. या सर्वांचे परिणाम राज्यघटनेत उमटणे स्वाभाविक होते.

गांधीजी हे राष्ट्रपिता. स्वातंत्र्य चळवळीतला फार मोठा वाटा त्यांचा. सरदार पटेल, पंडित नेहरू, राजगोपालाचारी, सुभाषचंद्र बोस (नेताजी), राजेंद्र प्रसाद.... ही गांधीजींच्या नेतृत्वात आयुष्य उधळून दिलेली काँग्रेसची प्रभावळ पाहिली म्हणजे हिमालयाच्या एकेका शिखरांशी स्पर्धा करणाऱ्या व्यक्तींनी ज्या गांधीजींचे नेतृत्व श्रद्धेने मान्य केले, त्या गांधीजींचा, त्यांच्या विचारसरणीचा, मतांचा निर्णायक प्रभाव घटनानिर्माणाच्या वाटचालीवर, प्रत्यक्ष घटनेवर सहज जाणवेल इतका दिसायला हवा. मात्र घटनावाचताना, थोडी समजून घेताना असा प्रभाव प्रकर्षाने जाणवत नाही. असे का झाले?

या प्रश्नांचे काहीसे उत्तर 'महात्मा गांधी आणि भारतीय राज्यघटना' या न्या. नरेंद्र चपळगावकरलिखित पुस्तकात सापडते.

न्या. चपळगावकर हे काटेकोर संशोधक म्हणून ज्ञात आहेत. निजामाविरुद्ध (त्या विचारसरणीविरोधी) स्वामी रामानंदतीर्थ यांच्या नेतृत्वाखाली जो प्रखर लढा तत्कालीन हैद्राबादच्या जनतेने दिला, त्यात चपळगावकर-कुटुंबाचा सहभाग जास्त आहे. स्वामीजींचे नेते महात्मा गांधी होते हे गुपित नाही. शिवाय लेखकाचे वडील व लेखक स्वतः यशस्वी वकील आणि लेखक पुढे हायकोर्टात नावाजलेले न्यायमूर्ती म्हणून निवृत्त झालेले. साहाजिकच राज्यघटनेची परिभाषा, न्यायव्यवस्थेत त्या भाषेचा अर्थ व्यवहारात कसा लावला जातो, सोबत या सर्वांची पार्श्वभूमी याचा लेखकाचा गाढा अभ्यास आहे.

एखादा मुरलेला गवई जसा पुरिया, दरबारी अशा रागांतला एखादा 'बडा' ख्याल मैफलीत मांडतो, तशी शैली लेखकाच्या इतर लिखाणावरून जाणवते. विषयाची गरज व शैली यांमुळे स्वातंत्र्यचळवळ, त्यातली मूल्ये, सामाजिक-आर्थिक-राजकीय भूमिका यांचा एक धावता आढावा लेखकाने नोंदला आहे. तो मांडला आहे त्या मर्यादेत आवश्यक आहे.

गांधीजी आणि भारतीय राज्यघटना हा विषय हाताळतांना सर्वांत मोठी अडचण असते ती संदर्भांची (Source Material). गांधीजी आपले विचार त्यांच्या मुखपत्रात लिहीत, त्यांच्या पत्रव्यवहारांतही मांडत. इतरही मार्गांनी ते व्यक्त होत. त्यातून परिस्थिती, गरज, पुढची वाटचाल या सर्व घुसळणीत ते आपली मते कधी कधी संपूर्णपणे बदलत. वयाच्या पन्नाशीपर्यंत त्यांना ब्रिटिश राजवट देवदत्त वाटली होती; मात्र पुढे ती सैतानी आहे, असे त्यांचे मत झाले. संस्थाने ही स्वतंत्र भारताच्या (एकेकाळच्या) अस्तित्वाचे अवशेष आहेत, असे त्यांचे एकेकाळचे मत पुढे बदलून संस्थाने संपवायला हवीत, या निर्णयाला ते आले. त्यांनी स्वतःच सांगितल्याप्रमाणे त्यांचे अलीकडचे मत जर पूर्वीच्या मताविरुद्ध आढळले, तर पूर्वीचे मत कालबाह्य अतएव रद्द समजावे. त्यांच्या लिखाण-पत्राचार-बोलणे या मोठ्या व्यापातून राज्यघटनेसंबंधी त्यांची निश्चित मते सुसूत्रपणे शोधणे फार अवघड काम होते.

हे अवघड काम श्री. श्रीमन्नारायण अगरवाल यांनी भारतीय स्वातंत्र्याच्या उंबरठ्यावरच्या काळात केले. ते






वर्धा येथे राहत. असताना संकलन-सरणी लावत जो दस्तऐवज त्यांनी तयार केला, त्या अभ्यासात शंका आली तिथे त्यांना शंकानिरसन प्रत्यक्ष गांधीजींकडून करून घेण्याची संधी होती. मुख्य म्हणजे हा प्रबंध तयार झाल्यावर गांधीजींनी तो वाचला होता व त्याला मान्यताही दिली होती. ग्रंथ १९४६ साली म्हणजे गांधीजींच्या हयातीत छापला गेला. त्यामुळे या ग्रंथात असलेली मांडणी घटनेची अभिप्रेत चौकट, दिशा यांबाबतही गांधीजींची परिपक्व मते हे गृहीत धरायला पर्याय नाही. १९४६ व पुढे स्वातंत्र्य, फाळणी, सांप्रदायिक दंगली, काश्मिर असे मोठे प्रश्न उभे राहिले. घटनासमिती आधी सुरू झाली असली, तरी खरे कामकाज स्वातंत्र्यानंतरच सुरू झाले. स्वतः गांधीजी घटनासमितीचे सदस्य नव्हते. त्यांनी या समितीच्या कामकाजात फारशी दखलही दिली नाही. स्वातंत्र्यानंतर फक्त सहा महिने उलटण्याच्या आत तर त्यांचा खूनच झाला. त्यामुळे जानेवारी ४८ नंतर गांधीजींचा प्रत्यक्ष संबंध घटनानिर्मितीत असणे शक्यच नव्हते.

महात्मा गांधींना स्वातंत्र्यानंतरचा जो भारत अभिप्रेत होता, तो खेडे हा मुख्य घटक निर्णायक ठिकाणी ठेवून. त्यामुळे लोकप्रतिनिधींची निवडणूक प्रत्यक्ष मतदानाने फक्त प्राथमिक स्तरावर म्हणजे ग्रामपंचायत इथपर्यंतच त्यांना हवी होती. पुढे तालुका-जिल्हा-प्रांत-राष्ट्र (लोकसभा-राज्यसभेची गरज त्यांना वाटली नव्हती) असे सर्व प्रतिनिधित्व अप्रत्यक्ष निवडणुकीद्वारे व्हावे, असे त्यांचे मत दिसते. या 'खेडे' या घटकावर संपूर्ण भर देण्यामागे अन्न-वस्त्र-निवारा यांसाठी खेडे पूर्वीच्या काळी कुणावर अवलंबून नव्हते, स्वयंपूर्ण होते तसे ते पुन्हा स्थापित करता येईल. ही खेडी म्हणजे खरा भारत. तेव्हा खरे अधिकार तिथे असावेत व तिथून वर 'झिरपत' केंद्रापर्यंत जावेत. या खेड्यांचे अधिकार, कररचना, प्रशासन, कर्तव्ये यांचा बराच तपशील पुस्तकात आहे. तो इथे खूप विस्तृत देण्याचे कारण नाही. याशिवाय न्यायव्यवस्था, यंत्रसामग्री....अशा काही गोष्टींबद्दल गांधीजींना अभिप्रेत रचनांचे प्रारूप यात आहे जे मुळातूनच वाचायला हवे. इथे हेही स्पष्ट केले पाहिजे, की ही संपूर्ण घडवलेली, कायद्याच्या परिभाषेत मांडलेली घटना नाही. घटना ही शेवटी घटनासमितीच तयार करणार मात्र त्यामागे काय विचार, दिशा, मूल्ये, रचना असायला हवीत, याचे महात्म्याला अभिप्रेत दर्शन त्यातून आपणांस घडते. इथे दर्शन हा देवदर्शन या अर्थी वापरलेला शब्द नाही, तर तत्त्वज्ञानात विचारधारा या अर्थी वापरला जातो ते इथे अभिप्रेत आहे.

इथे काही प्रश्न पडतात. पहिला म्हणजे ज्या स्वयंपूर्ण खेड्याच्या संकल्पनेवर हे आधारलेले आहे, तशी खेडी कधी अस्तित्वात असलीच तर कुठल्या काळी? त्या काळची भौतिक अवस्था काय? त्याच काळाकडे कौतुकाने परत जाण्याचा प्रयत्न हा दिशाबदल नसून कालचक्र उलट दिशेला नेण्याचा प्रयत्न नाही का?

दुसरा प्रश्न तंत्रज्ञानाच्या रेट्याचा आहे. आधुनिक विज्ञानाने जे तंत्रज्ञान जन्माला घातले, त्याला स्वतःची एक गती होती. दुसऱ्या महायुद्धाने या गतीचा वेग-आवेग प्रचंड वाढवला होता. त्या त्या टप्प्यावर स्वीकारणीय हा विचार काही प्रमाणात स्वीकारता येतो. गांधीजींनाही 'यंत्र' हे यंत्र म्हणून वावगे नव्हते. या यंत्र-तंत्राच्या रेट्यासमोर खेडी टिकली असती का?

तिसरा प्रश्न भारताच्या वाढत्या लोकसंख्येचा आहे. या वाढत्या लोकसंख्येच्या अगदी मूलभूत गरजा पुरवणे यासाठी जे रस्ते, रेल्वे, पोलाद-सिमेंट-इंधन गरजेचे आहे, त्यासाठी मोठे कारखाने याला पर्याय नव्हता. यात एक पेचही आहे. शेतमाल टिकवण्यासाठी जी शीतगृहे हवीत, त्यांची चलअचल साखळी हवी; तर त्यांची देखभाल करणारे सर्वदूर आवश्यक होतात. यांना वर्षभर काम शीतगृहांची साखळी पुरवू शकणार नाही. त्यामुळे घरगुती रेफ्रीजरेटर येतात, ते खरेदीवापर करणारे असावे लागतात. यांच्या देखभालीचे काम शीतगृहाच्या समकक्ष आहे. हे स्वयंपूर्ण खेडे कसे पेलणार?

चौथे म्हणजे भारतात काही क्षेत्रांत थोडे औद्योगिकीरण झाले होते. उदाहरणार्थ., कापड गिरण्या खादी हे अर्थकारण न परवडणारे आहे. ते स्पष्ट मत अण्णासाहेब सहस्त्रबुद्ध्यांनी दिलेले आहे. आज त्यांचे नाव फारसे ज्ञात नाही. मात्र खादी चळवळ खूप भरात होती, त्या वेळी अण्णासाहेब या क्षेत्रात निर्मिती-विक्री

अनुक्रमणिका





या प्रक्रियेचे तज्ज्ञ मानले जात. गांधीजींचे एक निकटवर्तीय, केंद्रीय मंत्रिमंडळात जाणे विचारणा असूनही नाकारणारे. या गिरण्यांच्या स्वस्त उत्पादनस्पर्धेत खेडी टिकू शकली असती का?

पाचवे म्हणजे भारतातली खेडीही जगापासून पूर्ण संपर्क तुटलेली नव्हती, ते शक्य नव्हते. माणसाला पाटा-वरवंटा हा एका टप्प्यावर श्रम थोडे कमी करणारा असला, तरी मिक्सर उपलब्ध झाल्यावर परवडणाऱ्या घरांनी तो आपलासा केला. कटकट, अवास्तव श्रम, सुरक्षितता, कालपेक्षा आज अधिक आराम देणारा म्हणून स्वागतार्ह असा माणसाचा प्रवास राहिला आहे. औद्योगिकीकरण झालेल्या क्षेत्रातून निर्मित वस्तू या खेड्यातल्या लोकांना हव्याहव्याशा वाटणारच; ती सहज-प्रवृत्ती आहे. अशा परिस्थितीत खेडी स्वयंपूर्ण राहणे अशक्य होते.

प्रश्न अनेक असणारचय मात्र इथे सहावा व शेवटचा प्रश्न संरक्षणाचा आहे. सर्वंकष युद्ध – टोटल वॉर-हे दुसऱ्या महायुद्धाने जगाला दाखवलेले भीषण वास्तव. नवस्वतंत्र राष्ट्र स्वतः जरी युद्धखोर असणार नाही असा विश्वास असला, तरी त्याच्यावर कुणी आक्रमण करणारच नाही याची खात्री कोण देणार? त्यामुळे संरक्षणसिद्धता महत्त्वाची होती. यासाठी औद्योगिकीकरण याला उत्तर नाही. शेतीसाठी ट्रॅक्टरनिर्मिती करणारे कारखाने थोड्या बदलावर रणगाडेही बनवू शकत होते. शिवाय नागरी क्षेत्रात एकही अशी गोष्ट नाही, जी सैन्याला आवश्यक नाही. यासाठी मूलभूत संशोधन हवे, विज्ञानशाळा हव्या. ८५% भारत खेड्यांत 'स्वयंपूर्ण' ठेवून हे साध्य करता येणे शक्यच नव्हते.

गांधीजींवर श्रद्धा. त्यांचे नेतृत्व मान्य. हे सर्व असणाऱ्या त्यांच्या प्रभावळीतल्या अनेक दिग्गजांना गांधीजींची ही संकल्पना मान्य नव्हती. यांतल्या पं. नेहरूंनी एका पत्रात 'आर्थिक क्षेत्रात तुमची मते काँग्रेसने विचारात घेण्याच्या श्रेणीतलीही मानली नाहीत', असे स्पष्ट लिहिलेही होते. सरदार पटेलांचेही मत निराळे असण्याची शक्यता नव्हती. त्यांनाही झपाट्याने बलवान भारत उभा करायचा होता. या प्रश्नावर अपवाद सोडले, तर पक्ष म्हणून काँग्रेस गांधीजींसोबत नव्हता.

स्वातंत्र्यावेळी फक्त पाकिस्ताननिर्मिती नव्हे; भारतातल्या काही भागांनी आपापल्या तऱ्हेने बाहेर पडण्याचे प्रयत्न केले होते. विघटनाच्या शक्यता टाळण्यासाठी प्रबळ केंद्र हवे या निर्णयाला नेतृत्व आले होते. त्या गरजेमध्ये सर्व शक्ती खेड्यात केंद्रित करणे शक्य नव्हते.

त्यामुळे २६/१/५० ला स्वीकृत घटना घडवली गेली. मात्र याचा अर्थ असा नव्हे, की गांधीजींना अभिप्रेत असे काहीच घटनेत आले नाही. तसे होणे अशक्य होते. लोकशाही व्यवस्थेत मूलभूत हक्क (नागरिकांचे) याला सर्वोच्च स्थान असते, असायला हवे. याचा ठराव कराची काँग्रेस अधिवेशनात स्वतः गांधिजींनी मांडणे यात काँग्रेस याला महत्त्व किती देत होती, हे अधोरेखित होते. अस्पृश्यता नाहीशी करणे यात महात्मा फुले, सयाजीराव गायकवाड, डॉ. बाबासाहेब आंबडेकर, शाहू-महाराज यांचे योगदान कुणीच नाकारू शकत नाही. यांत स्वातंत्र्यवीर सावरकरांचाही समावेश होतो. त्याचबरोबर महात्मा गांधीनी या क्षेत्रात जी वाटचाल केली, त्याचा फार मोठा प्रभाव यासंबंधीच्या घटनात्मक तरतुदींमध्ये दिसतो. अशा बऱ्याच गोष्टींमध्ये गांधीविचार घटनेत स्पष्ट-अस्पष्ट दिसतो-जाणवतो. लेखकाने या स्थळांकडे पुराव्यांसहित लक्ष वेधले आहे.

'संविधान वाटचालीचा इतिहास' उलगडतच राहणार. त्यात एका महत्त्वाच्या पुस्तकाची भर पडली आहे.

'महात्मा गांधी आणि भारतीय राज्यघटना'
लेखक : नरेंद्र चपळगावकर,
राजहंस प्रकाशन, पुणे.
पृ. संख्या. १६+१४७,
पहिली आवृत्ती- मार्च २०१३.
मूल्य रु. १६०/-

***

अनुक्रमणिका





## लेखकांचा परिचय

◈ **प्रा. डॉ. अशोक चौसाळकर**

राजकीय उपपत्ती व राजकीय चळवळी या दोन्हींचेही मर्मज्ञ अभ्यासक.

***पत्ता :–*** प्राध्यापक व विभाग-प्रमुख, विद्यानगरी, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर ४१६.००४.

दूरध्वनी :- (०२३१) २६३९४८५.

◈ **डॉ. अशोक कृष्णाजी जोशी**

इंग्रजी या विषयाचे प्राध्यापक (निवृत्त), गोवा विद्यापीठ. सौंदर्यशास्त्र, समीक्षा, तत्त्वज्ञान या विषयांचे अभ्यासक.

***पत्ता :–*** १२, सिंगबाल बिल्डिंग, टोक, करंझोले, गोवा–४०३००२.

दूरध्वनी :- (०८३२) २४६२९८१.

◈ **प्रा. डॉ. भगवान माने**

फ्रीलान्स जर्नालिस्ट. योजना मासिक, सुगावा, अस्मितादर्शन, विचारमंथन इत्यादी मासिकांमधून लेख प्रसिद्ध. राज्य व राष्ट्रीय स्तरावर शोधनिबंध वाचन. भारतीय संविधानाचा विशेष अभ्यास. महाराष्ट्र व लोकप्रशासन परिषदेचे कार्यकारिणीसदस्य.

***पत्ता :–*** असोसिएट प्रोफेसर, राज्यशास्त्र विभागप्रमुख, जयसिंगपूर, ता. शिरोळ, जि. कोल्हापूर – ४१६ १०१. भ्रमणध्वनी : ९७३०३१०६२०.

◈ **प्रा. रमेश पानसे**

प्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ. काही वर्षे अर्थशास्त्राचे पदव्युत्तर स्तरावरील प्राध्यापक. ग्राममंगल संस्थेकरवी आदिवासी भागात व अन्य ठिकाणी शिक्षणविषयक प्रयोग. आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक व साहित्य या विषयांवर विपुल लेखन. सुमारे ३० पुस्तके व ५००च्यावर लेख प्रसिद्ध.

***पत्ता :–*** ३१५, प्राज्ञपाठशाळामंडळ, गंगापुरी, वाई ४१२ ८०३ भ्रमणध्वनी : ९८८१२०८३६९

◈ **श्री. शि. ना. माने**

अर्थशास्त्राचे निवृत्त शिक्षक, स्वाध्ययनावर विशेष भर, माजी अध्यक्ष, मराठी अर्थशास्त्र परिषद, मागील ४५ वर्षे अर्थशास्त्रात अखंडितपणे लेखन.

***पत्ता :–***१२, दर्शन, सहयोग गृहनिर्माण संस्था, गोरखपूर, सातारा-४१५ ००३.

◈ **प्राचार्य डॉ. पंडितराव शा. पवार**

मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन. गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत.

***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक – ४२२०१३.

दूरध्वनी :- (०२५३) २३४३७८७. भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

◈ **विश्वास दांडेकर**

निवृत्त उच्चपदस्थ अधिकारी, आयुर्विमां महामंडळ; इतिहास, युद्धे व युद्धशास्त्र या विषयांमध्ये विशेष रुची व अभ्यास; वृत्तपत्रे व नियतकालिके यांमधून प्रासंगिक लेखन.

***पत्ता :–*** 'मालवती' १७ ब, कांगा कॉलनी, सदरबाजार, सातारा–४१५००१.

दूरध्वनी :- (०२१६९) २३५२५४.

वैदिक, संस्कृत भाषाशास्त्र

महाभारत - रामायण - भगवद्गीता,

संस्कृत वाङ्मय यांचे गाढे अभ्यासक व रसिक समीक्षक

प्राच्यविद्यापंडित डॉ.म.अ.मेहेंदळेकृत

# प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती

## निवडक मौलिक लेखांचा संग्रह

*प्रा.मे.पुं. रेगे यांच्या विवेचक प्रस्तावनेसह*

डेमी आकाराची ३८ + ५१६ पृष्ठे, पुठ्ठा बांधणी
किंमत : रु. ५५०/-

*संपर्कासाठी पत्ता*

चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)

सर्व धर्म अध्ययन केंद्र

**बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार**

प. ल. वैद्य

(या विषयावरील एका मौलिक परंतु दुर्मिळ ग्रंथाचे पुनर्मुद्रण. किंमत रू. ५०.००)

**धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार**

दि. के. बेडेकर

(आवृत्ती दुसरी; पृष्ठे ६४+८; किंमत रू. ३०.००)

*संपर्कासाठी पत्ता :* **सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा.**

अनुक्रमणिका

# लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका

हे मासिक घ. वा. जोशी यांनी के'सागर ग्राफिक्स अॅण्ड प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

रजिस्टर क्र. 11697/57



हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई